# श्री ताकपीठे विठोबा चरित्र



निवेदक - वाचस्पती श्री विष्णुजी क्षीरसागर, नाशिक



प्रत्यक्ष श्रीपांडुरंगाने
घरी येऊन ज्या दगडीतून
सौ. रमेने कालवून दिलेले ताकपीठ खाल्ले
ती देव - स्पर्शाने पवित्र झालेली
ऐतिहासिक दगडी

(महाजन वाड्यातील)

# श्री ताकपीठे विठोबा चरित्र



मुळ लेखक

✻ लेखक ✻

**वै. ह. भ. प. वे. शा. सं. नारायणशास्त्री महाजन बडवे**

श्रीमत भागवत कथाकार

✻ निवेदक ✻

**वाचस्पति श्री. विष्णुजी क्षीरसागर, नाशिक**

किंमत - ४० रुपये

✻ **प्रकाशक :**

**ह. भ. प. श्री. बंडा महाराज बडवे महाजन**

**श्री. प्रभाकर बडवे महाजन**

श्रीमत् भागवत कथाकार

✻ ७ वी आवृत्ती

✻ **प्रकाशन काल :**

मिती आषाढ शु. ११ शके १९४०
सोमवार दि. २३ जुलै २०१८
देवशयनी एकादशी आषाढी यात्रा पंढरपूर

✻ **मुद्रण :**

अरिहंत प्रिंटींग प्रेस
आळंदी देवाची, ता. खेड, जि. पुणे ४१२१०५.
मो. ९९२२४३६४५९

✻ **किंमत : ४० रुपये**

✻ **प्राप्तिस्थान**

श्री ताकपीठे विठोबा
महाजन वाडा, पंढरपूर

# संत सौ. रमाबाई महाजन बडवे यांच्या घराण्याविषयी थोडेसे

१) **संत सौ. रमाबाईंचे माहेर** - मुंगी पैठण, जि. औरंगाबाद (श्री. ह. भ. प. नरहर रामचंद्र नाईक यांची कन्या)

२) **सासर** - पंढरपूरचे महाजन बडवे घराणे
(ह. भ. प. नामदेव आण्णाजी महाजन बडवे यांची पत्नी)

३) रमाबाईंच्या ४० व्या वर्षी श्रीविठ्ठल रमेच्या घरी (महाजनांच्या घरी) ताकपीठ खाण्यासाठी आले म्हणून ताकपीठे विठोबा नाव पडले. जुन्या वाड्याची डागडुजी करुन बांधकाम केले. देव रमाबाईंच्या घरी आले म्हणून मंदिर म्हणतात.

४) शके १५४० मध्ये या मंदिराची डागडुजी पूर्ण झाली.
(संदर्भ - **पंढरपूरच्या अलक्षित कथा** ले. वा. ल. मंजुळ पुणे)

५) रमाबाईंच्या घरी श्री विठ्ठल आणि रुक्मिणी दोघेही ताकपीठ खाण्यासाठी आले शके १५३५. तेव्हापासुन या महाजन वाड्यात श्रीमत् भागवत कथा संस्कार वर्ग, भजन, कीर्तन होत आहे. येथील व्यवस्था रमाबाईंचे वंशज महाजन यांचेकडे असुन आजही चालू आहे. रमाबाईंच्या या वाड्याच्या उत्तर व दक्षिण दिशेस त्यांचीच घरे आहेत. (संदर्भ - **पंढरपूरचे प्राकृतिक वैभव** ले. प्रा. डॉ. सौ. जयश्री ज्ञानदेव रणनवरे पुणे.)

६) संशोधक श्री. रा. ची. ढेरे लिखित **'श्री विठ्ठल एक महासमन्वय'** या पुस्तकातही श्री ताकपीठे विठोबा उल्लेख आहे. **(खाजगी म्हणून)**

७) येथील पूजा अर्चा श्री महाजन बडवे यांचेकडे आजही आहे. या विठोबास कोणत्याही प्रकारचे उत्पन्न नाही. हे मंदिर महाजन बडवे यांच्या खाजगी मालकीचे आहे.



# वै. वे. शा. सं. नारायण शास्त्री महाराज महाजन बडवे

## चरित्र लेखकाचा अल्पपरिचय

श्री ताकपीठे विठोबा चरित्राचे लेखक वै. वे. शा. सं. ह. भ. प. श्री. नारायण शास्त्री बडवे महाजन हे संत सौ. रमादेवीच्या वंशातील ९ वे वंशज. संस्कृत भाषा आणि वैदिक शास्त्राचे ज्ञान व ज्योतिष शास्त्र त्यांनी वे. शा. सं. साहित्याचार्य गुरुवर्य श्री. लक्ष्मणशास्त्री नम्र यांचेकडून घेवून काव्यतीर्थ परीक्षेपर्यंत शिक्षण घेतले व पंढरपूरात 'शारदा विद्या मंदिर' नावाची पाठशाळा सुरु करुन अनेक संस्कृत प्रेमी विद्यार्थी तयार करुन पुण्याच्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे संस्कृत परीक्षा केन्द्र सुरु केले. (इ. स. १९५० ते १९६६)

या त्यांच्या शारदा विद्या मंदिरास खालील मान्यवरांनी भेट देवून त्यांच्या कार्याचे कौतुक केले. त्यामध्ये वै. ह. भ. प. श्री. सोनोपंत दांडेकर महाराज (मामा), गुरुवर्य लक्ष्मणशास्त्री नम्र, ह. भ. प. वै. बापूसाे चातुर्मास्ये महाराज, दे. भ. वै. श्री. बबनराव बडवे, वै. श्री. बाबुराव घळसासी, वै. श्री. शि. ह. धुपकर पुणे, जगद्‌गुरु शंकराचार्य संकेश्वर मठ करवीर, वै. वे. शा. सं. लक्ष्मीकांत जांभोरकर शास्त्री, पुणे. पंढरपूरात विवेक वर्धिनी शाळेत संस्कृत शिक्षकाचे काम केले.

संत सौ. रमाबाईसाठी (ताकपीठ खाण्यासाठी) देव महाजन वाड्यात कसे आले ? ही माहिती भाविकांना कळण्यासाठी हे चरित्र लिहिले. हेच चरित्र त्यांनी ओवीबद्ध केलेले पुढील आवृत्तीत आम्ही प्रकाशित करणार आहोत.

वै. ह. भ. प. श्रीकृष्णदास लोहिया महाराज यांच्या कीर्तनातून महाजन बडवे घराण्यातील 'विद्वान शास्त्री पंडीत' म्हणून नारायण शास्त्री महाजन यांचा उल्लेख ते नेहमी करीत असत. गेल्या ४० वर्षांपासून श्री. नारायण शास्त्री बडवे महाजन याच श्री ताकपीठे विठोबा समोर 'श्रीमत् भागवत् कथा' सांगत होते, ती परंपरा आजही चालू आहे.

– प्रकाशक



# ह. भ. प. वै.
# हरिभाऊ महाराज महाजन बडवे

(मुळ लेखक वै. नारायण शास्त्री
महाजन बडवे यांचे बंधू)

संत सौ. रमाबाईंचा वारकरी सांप्रदाय कीर्तन-प्रवचनद्वारा संपूर्ण मराठवाड्यात प्रसारित करुन प्रचार केला व संपूर्ण मराठवाडा भक्ती श्रद्धा आणि प्रेमाच्या द्वारा भक्तीरसाने फुलविला. त्यांचे कार्य आजही महाजन बडवे घराण्यात चालू आहे. त्यांच्या पुण्यतिथीनिमित्त आजही दरवर्षी आश्विन महिन्यात सात दिवस हरिनाम सप्ताह चालू आहे.

संत सौ. रमाबाईंच्या चरित्र लेखनाचे मूळ लेखन वै. ह. भ. प. वे. शा. सं. श्री नारायण शास्त्री महाजन बडवे आणि रमाबाईंची श्रीहरी भक्ती कीर्तन-प्रवचनाच्या द्वारे जन प्रबोधन करुन वारकरी संप्रदायाचा प्रसार आणि प्रचार केला असे श्री. वै. हरिभाऊ महाराज महाजन बडवे या **हरि नारायण** या बंधूंचे भक्तीमार्गाचे काम आजही सौ. रमादेवींच्या वाड्यात चालू आहे.

श्री. हरिभाऊ महाराजांची कीर्तन परंपरा त्यांचे नातु ह. भ. प. श्री. दर्शन महाराज हे समर्थपणे आज चालवित आहेत. म्हणजे संत सौ. रमाबाईंच्या महाजन वाड्यात पूर्वीपासून ३०० वर्षांपासून चालू असलेली सेवा (श्रीमत् भागवत व कीर्तन परंपरा) आजही चालू आहे.

# * समर्पण *

संत सौ. रमादेवीच्या भक्ती प्रेमाचा ठाव ज्यांच्या हृदयाने घेतला. महाजन घराण्यावर ज्यांनी अलोट प्रेम केले आणि ज्यांच्या अमृतवाणीने ज्यांनी आम्हास परमार्थात ओढून घेतले अशा त्या आमचे हृदयस्थ **वै. विद्यावाचस्पती विष्णुजी क्षीरसागर नाशिक** यांचे स्मृतीस

तसेच

संत सौ. रमादेवीचा परमार्थ आणि भक्तीचा वसा घेवून वारकरी सांप्रदायाचा प्रचार आणि प्रसारासाठी ज्यांनी उभे आयुष्य वेचले अशा महाजन घराण्यातील **वे. शा. सं. वै. नारायणशास्त्री महाजन बडवे** व **ह. भ. प. वै. हरिभाऊ महाजन बडवे** यांच्याही स्मृतीस ही सहावी आवृत्ती कृतज्ञतापूर्वक सादर समर्पण.

प्रकाशक

श्रीक्षेत्र पंढरी
आषाढ शु. ११
बुधवार दि. २१/०७/२०१०

# ❋ कथनक्रम ❋

# ॥ प्रथम आवृत्तीचे मनोगत ॥

वैकुंठनिवासिनी देवतास्वरूप सौभाग्यवती रमादेवी महाजन बडवे चरित्र कथन ह्या पुस्तकाचे प्रकाशन करण्याचे भाग्य केवळ दैवी ऋणानुबंधामुळेच पुण्यश्लोक सद्गुरु शिवपार्वती प्रतिष्ठानला लाभले आहे. सौ. रमाबाई यांना साधुवर्य श्री एकनाथ महाराजांचा कृपानुग्रह लाभला होता. श्रीनाथ महाराजांची तशीच कृपा आमच्यावरही झालेली आहे. त्यांची ज्येष्ठ कन्या गोदावरी हिचे स्वनामधन्य सुपुत्र कविवर्य मुक्तेश्वर यांचे आम्ही वंशज आहोत. एका अर्थाने सौ. रमा ही आमच्या कुलाची थोर माता गोदावरी हिची धाकटी भगिनी आहे. ह्या साक्षात्कारी मातृभगिनीचे अंशतः ऋण फेडण्याची सुसंधी तिच्याच कृपेने आम्हास लाभत आहे. मातृऋण हे कधीही फिटू शकत नाही. केवळ मातृकृपाच अखंड लाभावी लागते.

सौ. रमेचे वंशज ह. भ. प. श्री. प्रभाकरराव बडवे महाजन यांचा नाशिक क्षेत्राशी आलेला संबंध तसा अलिकडचा आहे. ह्या पुस्तकाचे लेखनिक, लेखक हा शब्द मी हेतुतः वापरला नाही, वाचस्पति श्री. विष्णुजी क्षीरसागर यांच्यावर त्यांचा अत्यंत लोभ आहे. श्री. विष्णुजींकडून ह्या लोभाच्या चंद्रभागेचा प्रवाह आमच्या द्वारी येऊन पोहोचला आहे. त्यात सुस्नात होऊन मातृसेवे प्रीत्यर्थ अर्घ्य समर्पण करण्याचे पुण्य आम्ही साधित आहोत.

वाचस्पति क्षीरसागर यांच्या तीन तपांवर अखंड चाललेल्या देशभ्रमणामुळे आणि व्याख्यानांद्वारा त्यांनी केलेल्या धर्म-जागरणाच्या असाधारण कार्यामुळे त्यांच्या हातून ग्रंथ लेखन असे होऊ शकले नाही. प्रकृती अस्वास्थ्यामुळे गेली काही वर्षे त्यांनी जवळ जवळ क्षेत्र संन्यास घेतला आहे. भगवान श्री विठ्ठल आणि

परमभक्तिमती सौ. रमेच्या असीम कृपेने त्यांनी हे चरित्र कथन केले आहे. देशाच्या कानाकोपऱ्यात वाचस्पतींची सुश्राव्य व्याख्याने ऐकलेला फार मोठा समाज आहे. त्यांनी हे पुस्तक अभ्यासनीय वाटेल असा विश्वास वाटतो.

सौ. रमा चरित्र प्रसिद्ध व्हावे ह्यासाठी तिच्या पवित्र कुलांतील वंशज ह. भ. प. श्री. बाळकृष्ण दिगंबर (बंडोपंत) महाजन बडवे आणि ह. भ. प. श्री. प्रभाकरपंत महाजन बडवे यांचे अपार श्रम कारणी लागले आहेत. नाशिकच्या श्रीमुद्राचे श्री. भारद्वाज रहाळकर यांनाही ह्या ग्रंथमुद्रणाद्वारे सौ. रमेच्या सेवेचे भाग्य लाभले आहे. श्रीभक्त आमदार श्री. सुधाकरपंत परिचारक यांच्या अध्यक्षतेखाली पंढरपूर क्षेत्री ह्या चरित्र कथनाचे प्रकाशन होत आहे. याचा आम्हास मनस्वी आनंद होत आहे.

पंढरीक्षेत्री वाचस्पति श्री. विष्णुजी क्षीरसागर यांच्या सहधर्मचारिणी सौ. वसुंधराबाई माई क्षीरसागर यांच्या शुभहस्ते ह्या सौ. रमाचरित्र कथनाच्या प्रति भगवान श्री विठ्ठल व परमभक्तिमती सौ. रमा यांच्या चरणी समर्पित करुन हे पुस्तक श्रीरमा पांडुरंगाच्याच कृपाशिर्वादाने प्रसिद्ध करीत आहोत.

**डॉ. मो. स. (आप्पासाहेब) गोसावी**
श्रीक्षेत्र पंढरपूर,
आश्विन कृ ।। ८ ।। शके १९१६
गुरुपुष्यामृतयोग
गुरुवार दि. २७ ऑक्टोबर १९९४

# ॥ प्रस्तावना ॥

भक्तजनवत्सल भगवान श्री पंढरीनाथ पंढरी नगरीमध्ये भक्तांची वाट पहात विटेवर उभा आहे. पण ज्या भक्तांसाठी ज्यांच्यापुढे त्याने आपली वीट सोडली व ज्यांच्या प्रेमासाठी भुकेला होऊन त्याने हात पसरला असे ही भक्त होऊन गेले.

त्यात भक्तिमती रमादेवी महाजन या प्रमुख श्री संत एकनाथांच्या काळात होऊन गेल्या व त्यांचे माहेरही पैठणच्या जवळील मुंगी हे गांवच होते. श्री एकनाथ महाराजांच्या पुण्यतिथीचा दिवस आणि श्री सौ. रमादेवी यांच्या पुण्यतिथीचा दिवस एकच आहे. फाल्गुन वद्य षष्ठी. त्यांचा विवाह पंढरपूर येथील श्री. नामदेव आण्णा महाजन बडवे यांच्याशी झाला. बडवे कुळात आल्यामुळे आणि श्री एकनाथापासून भक्तिभावाचे संस्कार घेऊन आल्यामुळे नित्य श्री पांडुरंगाचे दर्शन, नैवेद्य, उपचार यात त्यांचे मन रंगले. भगवत् प्रेमाने त्यांचे अंतःकरण व्यापून टाकले. ''तुका म्हणे येथे पिसे । तेथे तैसे असेल ॥'' या नियमाने भगवंतालाही त्यांच्या नित्य भेटीची ओढ लागली.

एके दिवशी भगवान विटेवरुन खाली उतरले आणि आपली गोकुळांतून आलेली जणू सखी समजून बालरूप धारण करून साध्वी रमाबाईच्या समोर भूक लागली आहे. काही तरी आता खायला दे म्हणून हात पसरुन उभे राहिले. घरात त्यावेळी असलेले ताक व लाह्याचे पीठ त्यांनी एका दगडीत कालवून देवासमोर ठेवले आणि त्याने ते आवडीने खाल्ले तेव्हापासून रमाबाईंच्या हातचे ताकपीठे नित्य मिळावे म्हणून रमारमण श्रीविठ्ठल मूर्तीरुपाने तेथे राहू लागला.

महाजन बडव्यांच्या घरात असणाऱ्या सख्या विठ्ठलाला लोक ताकपीठे विठोबा म्हणून ओळखू लागले. आजही पंढरीमध्ये ते एक पवित्र व दर्शनीय स्थान मानले जाते. श्री पांडुरंगाच्या मंदिरात जसे नित्य उपचार चालतात तसेच श्री. महाजन बडवे परिवाराकडून श्री ताकपीठे विठोबा मंदिरातही केले जातात.

भक्तिमती सौ. रमादेवीचे हे अलौकिक चरित्र अक्षरबद्ध करण्याचे कार्य वै. विद्वान वाचस्पती श्री. विष्णुजी क्षीरसागर यांनी दोन वर्षापूर्वी केले. एक वर्षातच या रसाळ चरित्राची पहिली आवृत्ती संपली आणि त्यातील विचार आणि भक्तचरित्राचा गोडवा, यामुळे या ग्रंथाची मागणी मात्र वाढली आहे. हे ध्यानात घेऊन आज या ग्रंथाची सहावी आवृत्ती प्रसिद्ध होत आहे. भाविकांना हा ग्रंथ घेणे सोयीचे व्हावे यासाठी या आवृत्तीची किंमत बाहेर सर्वत्र किंमत वाढत असता कमी करण्यात आलेली आहे. याबद्दल श्री. महाजन बडवे मंडळी अभिनंदनास पात्र आहेत.

ताकपीठे विठोबाचे आणि त्याच्या प्रिय भक्त असणाऱ्या रमादेवीचे दर्शन या चरित्रामुळे अधिक चांगल्या रीतीने आपणास होईल असा विश्वास वाटतो.

श्रीक्षेत्र पंढरपूर

श्री. ह. भ. प. भानुदास
महाराज देगलुरकर

# ।। प्रकाशकाचे मनोगत ।।

'केल्याने होत आहे रे आधी केलेचि पाहिजे' या समर्थ वचनाप्रमाणे श्रद्धा, भक्ती, प्रेम असेल तर माणसाच्या हातून चांगल्या गोष्टी घडून येतात. त्या सुद्धा अगदी सहज. नाही तर चांगल्या गोष्टी कधीही हातून घडत नाहीत. म्हणूनच ही सहावी आवृत्ती प्रकाशीत करताना आम्हास आनंद होत आहे.

श्री ताकपीठे विठोबा चरित्र प्रकाशित करावे अशी आमची गेल्या कित्येक वर्षापासूनची तीव्र इच्छा होती. पण सर्व कागदी पुरावे, माहिती त्यांचा शोध, लेखक, आर्थिक अडचण अशा अनेक कारणास्तव हे प्रकाशनाचे काम रेंगाळत पडले होते. मात्र निश्चयाचे बळ जवळ होते म्हणूनच वै. विद्यावाचस्पती श्री. विष्णुजी क्षीरसागर यांचे सारखे सिद्धहस्त लेखक लाभले. त्यांनी २ वर्ष सतत संत सौ. रमा देवीचा काळ व त्यावेळच्या सर्व गोष्टींचा अविश्रांत अभ्यास व संशोधन करून श्रम घेतले. नाशिकच्या शिवप्रतिष्ठानचे विश्वस्त श्री. आप्पासाहेब गोसावी यांनी आर्थिक बाजू सांभाळली आणि आमच्या परिश्रमांचे फळ मिळाले म्हणूनच आम्ही प्रथम आवृत्ती दि. २७.१०.१९९४ आश्विन कृष्ण ८ गुरुपुष्यामृत या शुभमुहूर्तावर भव्य प्रमाणात प्रकाशीत करु शकलो.

श्री ताकपीठे विठोबा चरित्र ही सहावी आवृत्ती भाविकांच्या हाती देताना आम्हास हर्ष होत आहे. चरित्राची प्रथम आवृत्ती व चरित्रातील भाषेचे वैभव वाचकांच्या ह्रदयात ठाव घेणारे होते. अनेक वाचकांच्या, भाविकांच्या मागणी व आग्रहास्तव ही सहावी आवृत्ती प्रकाशीत करीत आहोत.

या चरित्र प्रकाशनासाठी अनेक हितचिंतकांचे आशीर्वाद आमच्या पाठीशी आहेत. ह. भ. प. श्री. भानुदास महाराजांनी या आवृत्तीस प्रस्तावना लिहून दिली. पंढरपूरातील संत वाङ्मयाचे थोर अभ्यासक डॉ. गोपाळराव बेणारे यांनी अत्यानंदाने अभिप्राय दिला. त्यांचे आम्ही सदैव ऋणी आहोत. लेखन मुद्रणाचे काम अत्यंत सुबक व श्रद्धेने वेळेवर पूर्ण करुन दिले ते पंढरपूरचे श्री. साळुंखे यांचे ही आम्ही आभारी आहोत. शेवटी आम्हास प्रेरणा आणि पूर्ण सहकार्य ज्यांनी केले त्या नी. मामासाहेब बोरखेडकर यांचे आभार मानावे तेवढे थोडेच.

✻ प्रकाशक ✻

**श्री. प्रभाकर बडवे महाजन**
आषाढ शु. ११
बुधवार दि. २१.०७.२०१०

**श्री. ह. भ. प. बंडा महाराज**
**बडवे महाजन**
श्रीमत् भागवत कथाकार
संत सौ. रमादेवी निवास
महाजन वाडा, पंढरपूर

# ॥ अभिप्राय ॥

श्रीक्षेत्र पंढरपूर हे महाराष्ट्राचे धर्महृदय आहे आणि श्री विठ्ठल ही संतांची माऊली आहे. श्री विठ्ठल या देवतेने अनेक संतांना प्रत्यक्ष दर्शन दिले. त्यामध्ये संत ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, समर्थ रामदास, संत मुक्ताबाई, जनाबाई, कान्होपात्रा व संत रमादेवी वगैरे संत कवियत्रींचा समावेश आहे. संत रमादेवी महाजन ही संत कवियत्री आणि थोर भगवत् भक्त संत एकनाथांच्या घराण्याशी संबंधित आहे. ती साक्षात्कारी संत कवियत्री होती. तिच्या भक्ती आणि प्रेमामुळे ताकपीठे विठोबा मंदिर आज पंढरीत दिसते.

संत तेचि देव । देव तेचि संत ॥ या उक्तीप्रमाणे संत सौ. रमादेवी बडवे महाजन या देवतास्वरुप संत होत्या. पंढरीचा पांडुरंग त्यांच्या भक्तीला भुलून ताकपीठ खात असे. द्रौपदीची श्रीकृष्णावरील भक्ती आणि प्रेम आणि संत सौ. रमादेवी यांची भक्ती व प्रेम यात फरक नाही. संत रमादेवीची विठ्ठल भक्ती ही डोळस होती. त्यात अंधश्रद्धा नव्हती. सर्व साक्षात्कारी संतांनी विठ्ठलाचे वर्णन आपल्या अभंगातून केले आहे.

कोणी विठ्ठल म्हणतात. कोणी पांडुरंग म्हणतात. विठ्ठल पांडुरंगे तू व्यंकटाद्रौ रमासखम् ॥ हे गरुड पुराणातील वचन श्रीविठ्ठल विषयक असलेल्या निरनिराळ्या संतांचा संदर्भ देते. पैठणचा विजय पांडुरंग आणि पंढरीचा ताकपीठे विठोबा एकाच काळातील आहेत.

सौ. रमादेवी महाजन चरित्र म्हणजे प्रत्यक्ष ताकपीठे विठोबा चरित्रच होय. रमेच्या प्रत्येक कृती आणि भक्तिमागे ताकपीठे विठोबा उभा आहे.

आत्मज्ञाने चोखंडी । संत माझे रुपडी ॥ ही ज्ञानेश्वरीतील संज्ञा संत रमाबाईस लागू पडते.

महाजन घराण्याने सौ. रमादेवी चरित्र रूपाने ताकपीठे विठोबा भाविकांच्या समोर उभा केला आहे. ही फार मोलाची गोष्ट आहे.

पंढरपूर १.१२.१९९५ वै. डॉ. गोपाळ बेणारे

# ॥ ऋणानुबंध ॥

माझ्या तीन तपांच्या देशभ्रमणात भूवैकुंठ पंढरपूर बद्दल मला नेहमीच आकर्षण राहिले आहे. तसा मी तेथे खूप उशीरा पोहोचलो आहे. वै. ह. भ. प. सोनोपंत दांडेकर व वै. ह. भ. प. धुंडामहाराज देगलुरकर यांची माझ्यावर विशेष कृपादृष्टी होती; परंतु मी प्रत्यक्षात पंढरीचा सांप्रदायिक वारकरी नाही. आषाढी कार्तिकी वारीस कधीही जाणे झाले नाही. माझ्या गळ्यात पंढरीची तुळशीमाळ मात्र आहे. साधारण १२-१५ पिढ्यांपूर्वी पंढरपूर जवळच असलेल्या करकंब गावी आमचे क्षीरसागर घराणे वास्तव्य करीत असे. आमच्या घराण्यात श्री विठ्ठल भक्ती परंपरेने चालत आली आहे. ज्यांनी मला लहानपणापासून ग्रंथाभ्यासाचा छंद लावला, विचारांना वळण लावले, त्या माझ्या थोरल्या चुलत्यांचे नाव विठ्ठलच होते.

साधारण ३०-३२ वर्षांपूर्वी व्याख्यानांच्या निमित्ताने श्रीक्षेत्र पंढरपूरला मी प्रथमच गेलो. वै. ह. भ. प. गोविंद नारायण उपाख्य बंडोपंत बडवे मला श्री पांडुरंगाच्या दर्शनास घेऊन गेले होते. त्यांच्याच कृपेने त्या वास्तव्य कालात एका पहाटे गर्भागारात बसून श्री विठ्ठलाचा पूजा विधी पहाण्याचा व ऐकण्याचा योग आला. ऐकण्याचा अशासाठी की, वै. वेदमूर्ति गोविंदशास्त्री बेणारे यांचा खणखणीत शब्दात होणारा पूजाविधीचा मंत्र घोष ! गर्भागारात बाजूच्या भिंतीला टेकून ते उभे होते. त्यांचा होणारा मंत्रोच्चार अत्यंत स्पष्ट व शुद्ध होता. सारा गर्भागार त्या मंत्रोच्चाराने भरुन जात असे. पंढरीच्या वास्तव्यात प्रसिद्ध कीर्तनकार वै. ह. भ. प. हरिभाऊ महाजन बडवे मला आवर्जून भेटले होते. ताकपिठ्या विठोबाची कथा मला त्यांनीच सांगितली. ते मला त्याच्या दर्शनासाठी घेऊन गेले होते. तेथील ताकपीठाचा प्रसाद ही मला दिला. त्यानंतर प्रतिवर्षी मी व्याख्यानांच्या निमित्ताने पंढरपूरला जात असे. तेथील भक्तीच्या वायुमंडलाच्या सुखद आस्वादांत स्वतःला झोकून देत असे.

महाराष्ट्रीय संत वाङ्मयाची मला लहानपणापासूनच रुचि आहे. औरंगाबादेच्या एकनाथ संशोधन मंदिरात दोन तपाहून अधिक काळ मी व्याख्यानार्थ गेला आहे. त्या संस्थेचे संस्थापक अध्यक्ष न्यायमूर्ति वै. आण्णासाहेब घाटे यांच्या कृपेने श्रीनाथ महाराजांचे वाङ्मय भांडारच मला मिळाले. वै. ह. भ. प. जोग महाराजांचे नाशिकचे सद्‌शिष्य वै. श्री. काकासाहेब गद्रे व मुंबई विद्यापीठातील मराठीचे भूतपूर्व प्राध्यापक वै. नानासाहेब भागवत यांच्या कृपेने साधुवर्य तुकाराम महाराजांच्या चरित्र गाथेचा अभ्यास होऊ शकला. वै. प्रा. भागवतांच्या कृपेने श्री तुकाराम विश्वविद्यालय संघात माझा प्रवेश होऊ शकला. वै. प्रा. भागवतांनी श्री तुकाराम महाराजांना तर थेट जपानचा प्रवास घडविला. धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभा आणि श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर ह्या संस्थांशी समर्थभक्त वै. नानासाहेब देव यांच्या कालापासूनच माझा संबंध आला. अनेक वर्षे मी त्या संस्थांचा अध्यक्षही होतो. श्रीनाथपूर्वकालीन भावार्थ दिपीकेची हस्तलिखीत प्रत इतिहासाचार्य राजवाडे यांना बीडच्या पटांगण संस्थानांत मिळाली. ती १९०८ साली धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनेच प्रसिद्ध केली. श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरात बसुनच आचार्य विनोबाजी भावे यांचे कनिष्ठ बंधू श्री. शिवाजीराव भावे यांनी ज्ञानेश्वरीचा शब्दकोष सिद्ध केला. श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरात श्रीसमर्थ रामदास स्वामींच्या बरोबरच मला श्री ज्ञानेश्वर महाराजांचे वाङ्मयीन दर्शन झाले. श्रीसमर्थभक्त वै. नानासाहेब देव यांनी इतिहासाकडे अभ्यासक म्हणून पाहण्याची दृष्टी मला दिली.

ग्रंथ लेखन हे माझ्या हातून वस्तुतः कधीही झालेले नाही. तीन तपांच्या देशभ्रमणात मी सतत व्याख्यानेच देत राहिलो. अखंड गतिमान राहिलेल्या प्रवासात लेखन शक्यच नव्हते. मी दिलेली व्याख्याने शब्दबद्ध करावीत असा निकटवर्तीयांचा सततचा आग्रह

आहे. अद्यापी तरी ते शक्य झाले नाही. वैकुंठ निवासिनी देवतास्वरूप सौभाग्यवती रमादेवी महाजन बडवे यांच्या चरित्र लेखनाचे कार्य हे केवळ ऋणानुबंधामुळेच माझ्याकडे आले आहे. दहा पिढ्यांपूर्वी साधारण चार शतकांपूर्वी झालेल्या ह्या महान भक्तिमती विभूतीचे स्वतःचे असे कोणतेही लिखित वाङ्मय उपलब्ध नाही. त्यांनी अभंग अथवा ओव्या रचल्या नाहीत. तसेच ग्रंथ लेखनही केले नाही. वै. वे. शा. सं. ह. भ. प. नारायण शास्त्री महाजन बडवे यांनी लिहिलेल्या 'संत रमाबाई चरित्राचे' लहानसे हस्तलिखीत त्यांचे कनिष्ठ बंधू वे. शा. सं. श्री. बाळकृष्ण शास्त्री यांचेकडून मला उपलब्ध झाले. वै. नारायण शास्त्री हे शके १९८८ मध्ये म्हणजे सन १९६७ मध्ये वैकुंठवासी झाले. त्यांच्या दर्शनाचे सौभाग्य मला लाभले नाही. १९४६ साली त्यांनी ते हस्तलिखीत चरित्र लिहिले आहे.

पंढरपूरच्या होळकर संस्थानच्या वाड्यांत बराच जुना ऐतिहासिक हस्तलिखितांचा संग्रह सुरक्षित जपून ठेवलेला आहे. त्या वाड्यात अलिकडे २/३ वेळा माझे वास्तव्यही झाले आहे. ह्या होळकर वाड्याचे कारभारी श्री. वसंतराव बोरखेडकर यांच्या कृपेने तेथील ऐतिहासिक लिखितांचा संग्रह मला पहावयास मिळाला. सन १८८४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या बॉंबे गॅझेटीयरची प्रत तेथे मला पहावयास मिळाली. त्यात सोलापूर विभागाच्या भागात पृष्ठ ४५५-४५६ वर प्रकरण १४ मध्ये ताकपिठ्या विठोबा संबंधात माहिती प्रसिद्ध झालेली आहे. मला ती महत्त्वाची वाटते.

होळकर वाड्यातील ह्या हस्तलिखितांच्या संग्रहात संत रमाबाईचे पती वै. नामदेव आण्णा महाजन बडवे यांनी आपले सुपुत्र वै. दादा यांना श्रीक्षेत्र काशीहून माघ शु. ।। द्वितीया शके १५३० (इ. स. १६०९) मध्ये लिहिलेल्या मूळ मोडी लिपीत असलेले पत्र उपलब्ध आहे. त्याचा संदर्भ ह्या पुस्तकांत घेतला आहे. ह्या संबंधांत

श्री. वसंतराव बोरखेडकरांनी आत्मियतेने जे सहाय्य केले त्याचे ऋण व्यक्त करण्यास माझ्याजवळ शब्द नाहीत. पैठणचे माझे स्नेही ह. भ. प. श्री. वि. मा. कुलकर्णी यांनी पैठणची अज्ञात माहिती मला दिली. स्वतः मुंगीला जाऊन तेथील नाईक परिवाराकडून बरीच माहिती संकलित केली. त्यांच्या बहुमोल परिश्रमांबद्दल ऋण व्यक्त करणे माझे कर्तव्य आहे.

श्रीभगवत्कृपा प्राप्त व्यक्तींची चरित्रे ही भाविक वाचकांच्या दृष्टीने विलक्षण आकर्षणाचा विषय असतो. त्यांत गूढ रम्यताही असते. त्यांच्या जीवनात चमत्कार घडत असतात. त्या चमत्कारांमुळे भाविकांची मूळची श्रद्धा अधिक दृढ होत असते. 'श्रद्धावान् लभते ज्ञानम्' असे भगवद्वचन आहे. श्रद्धेमुळे धर्म जीवनाची जोपासना होते. काहींचे आचार ही कर्मठ होतात. ते स्वतःच्या संबंधातील आचारात अत्यंत कठोर बनतात; परंतु इतरांशी व्यवहार करताना लोण्याहून ही मऊ होतात. श्रद्धा माणसाचे जीवन शुद्ध करीत असते. त्याला पवित्रतेचा सुगंध येऊ लागतो. त्यामुळे त्याला परम ज्ञानाची प्राप्ती होत असते. 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।' असेही भगवद्वचन आहे. वस्तुतः भगवत् श्रद्धा ही अनेक जन्मांच्या जन्मजन्मांतरांच्या फलितांचे दृष्य स्वरूप आहे. त्या श्रद्धेची परिणती अखेरीस श्री भगवंताच्या दर्शनात होते, भगवत् कृपेत होते. वर्तमानकालात भाविकांच्या श्रद्धेला तथाकथित विचारवंत अंधश्रद्धा म्हणतात. ही अंधश्रद्धा निर्मूलनासाठी ते प्रयत्नशील आहेत. एकाही अंधश्रद्धा निर्मूलकाला ज्ञान प्राप्त झाल्याचे माझ्या ऐकण्यात नाही. शल्यक्रिया करणाऱ्या शल्य विशारदाला शल्य चिकित्सा गृहात किती शुद्धता, निर्जन्तुकता पाळावी लागते हे आपण जाणतोच. त्या शुद्धतेमुळे शल्यक्रिया व्यवस्थित पार पडते. त्या बरोबरच शल्यचिकित्सा विशारदाच्या मनाच्या एकाग्रतेतून शल्यक्रीया पार पाडणारे त्याचे हात व सुक्ष्म

दृष्टी असलेले डोळे ती क्रिया यशस्वी करण्यासाठी सहाय्यभूत होत असतात.

श्रीभगवत् दर्शनाची अनुभूति प्राप्त होणारी मानवी क्रियाही अशीच असते. मात्र तेथील शुद्धता ही बाह्य नसुन अंतरंगाची आहे. त्या शुद्धतेतून त्याचे मन आपल्या आराध्य देवतेकडे पूर्णत्वाने लागलेले असते. डोळे आराध्य देवतेला पहात असतात आणि कर्मेंद्रिय असलेले हात भगवत् भजनासाठी टाळ्या वाजवतात किंवा नामजपासाठी स्मरणीचे मणी ओढतात. वाणीने मधुर भक्तीगीते गात श्री विठ्ठलाला खाऊ घालण्यासाठी लाह्यांचे पीठ दळतात. त्यांत घालावयाच्या ताकासाठी दधिमंथन करतात. कोठे एखाद्या जनाबाईसाठी, भक्ताच्या भरणपोषणासाठी, देव ती थकलेली पाहून दळताना मदत करतो. तसेच भगवंताच्या बालभोगासाठी लोणी हवे म्हणून एखाद्या राधेला अथवा मीरेला तिच्या दधिमंथन क्रियेत सहाय्य करतो. आपल्या चरित्र नायिकेच्या जीवनात लाह्याचे पीठ दळणे व दधिमंथन करणे ह्या दोन्ही क्रिया सातत्याने होत आहेत.

भारत ही भगवंताची लीला भूमि आहे. ताकपिठ्या विठोबा प्रमाणे चमत्कारांची वलये असलेली देवतास्थाने मी माझ्या भ्रमणात पाहिली आहेत. व्रजभूमितून एका भक्तासाठी दूरवर साक्ष देण्यासाठी गेलेल्या साक्षी गोपालास मी ओरिसात जगन्नाथपुरी जवळ पाहिले आहे. आपले परमप्रिय भक्त माधवेन्द्र पुरी यांना नैवेद्यातील स्वादिष्ट खिरीचा प्रसाद मिळावा म्हणून नैवेद्याच्या ताटातील अख्खी खिरीची वाटी उचलणारा क्षीर चोर गोपीनाथ मी वृन्दावनांत पाहिलेला आहे. आमच्या नाशकांतही एका आर्त भक्ताला प्रत्यक्ष दर्शन देण्यासाठी आलेल्या विठ्ठलाचे मंदिर चतुःसंप्रदाय आखाड्यात आहे.

ह्या सर्व कथा किंवदन्ती सदरात मोडतात. दंतकथांच्या आधारे अशी बरीच मंदिरे आपल्या देशात उभी आहेत. ती बहुतेक भगवान

आनंद भरु देतो. भक्ताला सुख देणे हे त्याचे कार्य अहर्निश चालू आहे. तो बोलत नाही असे दिसते पण त्याचे काम ऐकत असतात. डोळे सारे काही पाहू शकतात. तो सदा सर्वदा जागृत आहे. प्राचीन कालापासून आजपर्यंत त्याने अनेकांना आपल्या अस्तित्वाची जाणीव करून दिली आहे.

श्री विष्णुस्वामी संपद्राय अडीच सहस्त्र वर्षांचा जुना आहे. श्री विष्णुस्वामी दाक्षिणात्य-परम वैष्णव, वितरागी. श्री विठ्ठलाचे निःस्सीम भक्त ! ह्या संप्रदायाचे एकपीठ काशीस मनिकर्णिका घाटावर आहे. त्या षष्ठ पीठावरील अधीश्वर महंत श्री जमुनादासजी महाराज सतुआ बाबा हे आहेत. मागच्या सिंहस्थाच्याआधी काही दिवस ते नाशिकला आले होते. सिंहस्थ कालातील क्षेत्र वासाच्या व्यवस्थेची पहाणी करण्यासाठी ते आले होते. श्रीविष्णुस्वामी संप्रदाय प्राचीन आहे; परंतु त्यात वितरागी साधूंची संख्या फारच थोडी आहे. श्रीमत् वल्लभाचार्य हे श्रीविष्णुस्वामी संप्रदायातीलच होत; वल्लभ संप्रदाय हा एका अर्थी श्रीविष्णुस्वामी संप्रदायच आहे.

पू. महंत श्री जमुनादासजी महाराज सतुआ बाबा हे उच्च श्रेणीचे साधक असून सिद्धावस्था प्राप्त पुरुष आहेत. त्यांच्या वितरागी संप्रदायाचा द्वारा श्री विठ्ठल व श्री नामदेव हा आहे. त्यांच्याशी बोलत असताना त्यांच्या संप्रदायाच्या श्रेय नामावलीत श्री ज्ञानदेव व श्री नामदेव यांचे उल्लेख असल्याचे ध्यानात आले. सहज बोलण्याच्या ओघात महाराष्ट्रीय वारकरी हाही विठ्ठल भक्त असून त्यात बहुतांशी गृहस्थी भक्त आहेत. एका अर्थाने ती गृहस्थांची अशी श्री विष्णुस्वामी संप्रदायाचीच शाखा आहे. त्यामुळे त्यांनाही नाशिकच्या सिंहस्थ पर्वात वितरागी साधूंच्या शाही स्नानांत सामील करून घ्यावे. विठ्ठल भक्तांची नाती दृढ करावीत, असा विचार त्यांच्या पुढे मांडला. त्यांना तो आवडलाही ! परंतु महाराष्ट्रात त्यांचा फारसा संपर्क नसल्याने त्या संबंधात मीच हालचाल करावी असे

त्यांनी मला आवर्जुन सांगितले. श्री सतुआ बाबांच्या ह्या बोलण्यामुळे माझ्या विचारांना एक गती मात्र मिळाली.

सिंहस्थातील शाहीस्नानात वारकऱ्यांना सामिल करून घेणे ही गोष्ट निश्चित आनंददायी होती; परंतु हे कार्य अत्यंत कठीण आहे. हे लगेच माझ्या ध्यानांत आले. जे जमावे कसे ? हा मोठा प्रश्न माझ्यापुढे होता. मी स्वतः तुळशीमाळ धारण करीत असलो तरी सांप्रदायिक वारकरी नाही. संप्रदायात मी कोठेही नाही. वारकरी संप्रदाय मला अभ्यासामुळे जवळचा आहे. संप्रदायातील अनेक भगवत् भक्त मला सुपरिचित आहेत. सांप्रदायिक नामसप्ताहात मी अनेक ठिकाणी सहभागी झालेलो आहे; परंतु स्वतः वारकरी नाही ही दुःखदसल माझ्या हृदयाला बोचत होती. मग हा विषय बोलावा कोणाशी ? हा प्रश्न माझ्यापुढे पडला. ज्यांच्याशी ह्या विषयावर मोकळेपणाने बोलणे शक्य झाले असते. ज्यांच्याशी अंतरिक जिव्हाळ्याचे ऋणानुबंध होते असे परम श्रद्धेय ह. भ. प. सोनोपंत दांडेकर वैकुंठवासी झालेले तर पू. श्री. धुंडामहाराज देगलुरकर वार्धक्यामुळे विकल होऊन शय्येवर पडलेले. पुजारी सर्वत्र होते पण साक्षात्कारी कोठे शोधणार ? श्रीज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम एका मागे एक झाले; परंतु त्यांची उंची साधलेला, साऱ्या समाजाला आपल्या बरोबर घेऊन जाऊ शकेल असा कोणी पुरुष मला दिसू शकला नाही किंवा तो शोधण्याची पात्रता आपल्या अंगी नाही. ही दुःखद जाणीव मला सतावित होती. वारकरी संप्रदायाची शतावधी वर्षांची जी बांधणी आहे ती अनेक फडांच्या घट्ट गुंफणीमुळे आहे. नियम बद्ध आचारामुळे आहे. ह्या विठ्ठल भक्तांच्या एकाही फडांत शक्य असूनही आपण सामील होऊ शकलो नाही. हे निश्चितच दुर्दैव होते. अशा नाना विचारांनी मन त्रस्त झाले होते.

अशा विचारांच्या चक्रव्यूहांत मी पूर्णपणे गुरफटलो गेलो, सचिंत झालो. त्या कालात एका संध्याकाळी ह. भ. प.

श्री. प्रभाकरपंत महाजन बडवे काही परिचितांना बरोबर घेऊन नाशिकला माझ्या भेटीस आले. येताच त्यांनी श्री पांडुरंगाचा प्रसाद दिला. वै. प्रल्हादमहाराज बडवे यांच्या पुण्यतिथी महोत्सवात व्याख्याने देण्यासाठी मी पंढरीस यावे असे अगत्याचे आमंत्रण त्यांनी दिले. केवळ त्यासाठीच ते कष्ट घेऊन नाशिक पर्यंत आले होते. हृदय विकाराने मी पीडित असल्याने आता दूरचा प्रवास करू शकत नाही. व्याख्याने देणेही बंद केले आहे. असे त्यांना सांगून त्या महोत्सवात सहभागी होण्याची असमर्थता व्यक्त केली. ते खूप निराश झाले. आमंत्रण स्वीकारण्याचा विचार करावा असे पुनः पुनः आग्रहाने सांगून दुसऱ्या दिवशी पुनः भेटीस येतो असे म्हणाले. आपल्या वास्तव्यस्थानी परत गेले. त्यांचे प्रेमाचे आमंत्रण केवळ प्रकृती अस्वास्थामुळे आपल्याला स्वीकारता येत नाही. श्री पांडुरंगाच्या दर्शनाची आलेली संधीही आपण गमावतो आहोत याचे मला मनस्वी दुःख झाले.

रात्री विचार करताना मला पंढरपूरातील एक अत्यंत सुखद प्रसंग आठवला. व्याख्यानासाठी एकदा मी तेथे गेलो असताना वेदमूर्ति देवधरांच्या घरी माझे वास्तव्य होते. एका सकाळी बरीच बडवे मंडळी एकत्रित होऊन तेथे माझ्या भेटीस आली. श्री पांडुरंगाने आपल्याला दर्शनाला बोलावले आहे. दुपारी न्यायला येतो असे सांगून गेली. हे आमंत्रण मला आश्चर्यात टाकणारे तर होतेच पण दर्शनास जाण्याचा सोहळाही लोकविलक्षण असाच होता. टाळमृदुंगांच्या गजरात ते मला मोठ्या संख्येने देवळात घेऊन जाण्यासाठी आले. हळदी कुंकवाचे सडा संमार्जन केलेल्या महाद्वार रस्त्याने आम्ही देवळात गेलो. श्री पांडुरंगाचे दर्शन करविले. अंगावर महावस्त्र घातले. देवाचा हार गळ्यांत घातला. प्रसाद दिला सारे काही अपूर्व ! पूर्वी कधीही न अनुभवलेले असे होते. अशा बडव्याचे, वै. प्रल्हाद महाराजांच्या पुण्यतिथी महोत्सवाचे आमंत्रण प्रकृति आपल्याला स्वीकारू देत नाही याचे अतिशय वाईट वाटले.

माझ्या नित्याच्या सवयी प्रमाणे पहाटे ३.३० वाजण्याच्या सुमारास उठून मी माझ्या दिनक्रमास लागतो. त्या ब्राह्ममुहूर्ती मला कोणीतरी हलवून जागे करीत असल्याचे जाणवले. तुझा प्रश्न सुटण्यासाठी तू प्रत्यक्ष विठोबालाच पत्र लिही असे स्पष्ट शब्द मला कानांनी ऐकू आले. त्या वाणीत विलक्षण माधुर्य होते. उत्साहदायी प्रेरणाही होती. लगेच मी ते पत्र लिहावयास घेतले. त्याची सुवाच्च अक्षरात चांगली प्रतही लिहीली आणि पंढरीहून आलेल्या मंडळीची मार्ग प्रतिक्षा करू लागलो.

दिलेल्या वेळी ती मंडळी माझ्याकडे आली. शारीरिक व्याधीमुळे माझी प्रवास करण्याची असमर्थता मी पुनः त्यांना सांगितली. श्री पांडुरंगास लिहिलेले ते लिखित पत्र मी ह. भ. प. श्री. प्रभाकरपंत महाजन बडवे यांच्या स्वाधीन केले आणि त्यांना म्हणालो की, 'देवाच्या सर्वात जवळचे आपण आहांत. पंढरीस गेल्यावर श्री विठ्ठल चरणी हे पत्र अर्पण करा. गर्भागारात ते सर्वांना वाचून दाखवा आणि प्रसिद्ध करा.' ते पत्र त्यांनी लगेच वाचले आणि दाटलेल्या कंठाने मला म्हणाले, 'केवळ एक पोस्टमन म्हणून मी हे पत्र देवाला जरूर देईन; पण वाचून दाखवूनही तो माझे कसे ऐकणार ? पोस्टमनला कोण विचारतो ? तुमच्या स्वास्थासाठी तुम्हाला खाजगी गाडीने पंढरीस नेतो. पुनः परत घरी आणून पोहोचवितो. तुम्ही स्वतःच पंढरीस येऊन पांडुरंगाला काय ते सांगा ?'

आत्मस्तुतीचा भाग टाळला जावा म्हणून मी एवढेच लिहितो की, त्यांनी केलेल्या व्यवस्थेनुसार मी सपत्नीक पंढरपूरला गेलो. आपल्या पत्र लेखनात किंचीतही दोष राहू नये, औधत्यही दिसू नये म्हणून रुग्णशय्येवर असलेल्या पू. धुंडामहाराज देगलूरकरांच्या दर्शनास प्रथम गेलो. त्यांना ते पत्र वाचून दाखविले. त्यांची अनुज्ञा घेतली मगच ते पत्र श्री विठ्ठल चरणी अर्पण केले. त्याच्या परिणामात सहस्त्रावधी वारकरी बांधव नाशिकच्या सिंहस्थ कुंभपर्वकालात

पू. सतुआ बाबांच्या बरोबर तिन्ही शाही स्नानास टाळमृदंगाच्या, श्रीरामकृष्णहरिच्या गजरात खांद्यावर भगवी धर्मध्वजा घेऊन पवित्र गोदावरी स्नानासाठी रामकुंडावर गेले. ते दृश्य लक्ष लक्ष डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिले आहे. पंढरीच्या वारकऱ्यांना साधूंसमवेत शाहीस्नानास जावयाचे द्वार विठ्ठल द्वाराने उघडले गेले. ह्या संबंधात पंढरपूरचे सर्वश्री ह. भ. प. श्री. बाबासाहेब, श्री. बाळासाहेब, श्री. गोपाळराव बडवे विशेषत्वाने श्री. प्रभाकरराव महाजन बडवे आणि नाशिकचे माझे स्नेही श्री. भालचंद्र दामोदर (आप्पासाहेब) काळे व त्यांच्या सहधर्मचारिणी सौ. माई यांनी जे परिश्रम घेतले त्यांचे स्मरण मला अखंड रहाणार आहे.

ह्या सिंहस्थ पर्वकालातच भाद्रपद शु. ।। एकादशी शके १९१३ इ. स. १९९१ ह्या शुभदिनी पू. श्री सतुआबाबा श्री पंढरीनाथाच्या दर्शनास गेले होते. त्यांच्या समवेत मलाही पंढरीस जाण्याचे भाग्य लाभले. सिंहस्थ पर्वात साधूंच्या शाहीस्नान सोहळ्यात वारकऱ्यांना सहभागी करून घेण्याचे अभूतपूर्व कार्य करणाऱ्या ह्या महापुरुषाचे स्वागत करण्यासाठी अवघी पंढरी सजली होती. त्यांचे दर्शन घेण्यासाठी प्रचंड जनसागर गोळा झाला होता. टाळ मृदुंगाच्या गजरात सहस्त्रावधी वारकरी भक्तांच्या समवेत पू. श्री सतुआबाबा देवदर्शनास गेले. मार्गांत पावला पावलावर त्यांचे स्वागत होत होते. त्यांचे चरण प्रक्षाळिले जात होते. आरत्या होत होत्या. पुष्पवृष्टी होत होती. पंढरपूराने तो देवदुर्लभ सोहळा पाहिला. बडवे व उत्पात मंडळींनी पू. श्री सतुआबाबांच्या अभूतपूर्व सत्कार करून त्यांच्या विषयी निरतिशय कृतज्ञता व्यक्त केली. पू. बाबाजी समवेत त्या मंडळींनी माझा जो सत्कार केला त्याबद्दल ऋण व्यक्त करावयास माझ्यापाशी शब्द नाहीत. त्यांच्या प्रेमाच्या वर्षावाने मी पूर्णतः न्हाऊन निघालो.

पंढरीनाथ श्री विठ्ठलाच्या दैवी विग्रहाचे दर्शन घेताना असे जाणवते की, तो एका लहानशा विटेवर उभा आहे. पुंडलिकाने

फेकलेल्या विटेवर देव विसावला आहे. स्वर्गादि लोकांत पृथ्वीवरील लोकांसारखी मातृपितृ भक्ति नसल्याने तो देवांनाही दुर्लभ असलेली ती सेवा कौतुकाने पाहू लागला. सहजतेने त्याचे हात कमरेवर गेले. निरतिशय औत्सुक्याने ते मातृपितृ सेवेचे विलक्षण दृश्य भगवंत पाहू लागला. वैकुंठाहून पुंडलिकाकडे आल्यावर त्याने त्याला उद्देशून कानडीत काही बोलल्याचे सांगितले जाते. पंढरीस तो द्विभुज होऊन आला. उजव्या हातात प्रफुल्लित कमळ व डाव्या हातात पांचजन्य शंख घेऊन अवतरला आहे. भक्तासाठी तो येथे आला असल्याने 'हातिचेनि लीलाकमळें । पूजूं तयाते ।' १२-२२२ हे श्रीज्ञानदेवांचे सांगणे अपूर्व आहे.

'विनाशायच दुष्कृताम्' हे भगवदावताराचे एक महत्वाचे उद्दिष्ट मानले जाते. दुष्कृतांना सचेत करण्यासाठी पांचजन्याचा उद्‌घोष करण्याची श्रीभगवंताची रीत आहे. तो पांच जन्य घेऊन आलेला आहे हे निश्चित आहे. त्याच्या उजव्या हाती चक्र आहे. असेही काही उपासक मानतात. श्री विठ्ठल भक्तांचा प्राचीन संप्रदाय श्रीविष्णुस्वामी संप्रदाय हा विठ्ठलाच्या उजव्या हाती चक्र असल्याचे मानतो. पंजाबच्या माझ्या भ्रमणात उजव्या हाती चक्र असलेले श्रीविठ्ठलाचे देवता विग्रह मी पाहिले आहेत. श्री नामदेव महाराजांचे पंजाबात दीर्घकाळ वास्तव्य झाले आहे. शीख संप्रदायात त्यांच्या विषयी अत्यादराची भावना आहे. शीखांचे दहावे गुरु श्रीगुरुगोविंदसिंहजी महाराज हे आपल्या मस्तकी असलेल्या पगडीवर चक्र बांधित असत. ते चक्राचा उपयोग युद्धातही करीत असत.

परित्राणाय साधुनाम् ! हे भगवदावताराचे महत्तम कार्य आहे. साधूंचे रक्षण करावयाचे असेल तर त्यांना पीडा देणाऱ्या दुष्टांचा विनाश करणे अटळ असते. ह्या संबंधात साधूवर्य तुकाराम महाराजांनी मांडलेले विचार मोलाचे आहेत.

"कटावरी कर कासया ठेविले । जननी विठ्ठले जीवलगे ।
शंखचक्रगदा कमळ मंडित । आयुधे मंडित कृष्णाबाई ।।"
"दया तिचे नांव भूतांचे पाळण । आणिक निर्दाळण कंटकांचे ।।"
"घेऊनिया चक्रगदा । हाचि धंदा करितो ।
भक्तराये पायापाशी । दुर्जनाशी संहारी ।।"

परम अहिंसक तुकोबारायांना दुवृत्तांचे हृदय परिवर्तन मान्य नसावे असे वाटते. कसे मान्य असणार ? प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णांनी कौरवांच्या राजसभेत जाऊन केलेला हृदय परिवर्तनाचा प्रयोग फलदायी ठरला नाही. केवळ राजा युधिष्ठिरांच्या अत्याग्रहामुळेच त्यांना तो प्रयोग करावा लागला. हस्तिनापूरला जावे लागले. बलवान उन्मत्त कधीही कोणाचे ऐकत नाहीत. सदुपदेश त्यांना नेहमी कटू करतो. म्हणून अशांचा समूळ नाशच प्रत्यक्ष भगवंतालाही अभिप्रेत आहे.

त्याचबरोबर तोच पांडुरंग श्रीएकनाथ महाराजांच्या घरी डावा हात कमरेवर ठेऊन उजवा हात लोणी खडीसाखरेसाठी पुढे करतो. 'दास जेवू घाल वा न' असे शब्द उभ्या असलेल्या विटेवर उमटवितो. तो विजयी पांडुरंग पैठणला श्रीनाथांच्या देवघरात आहे. ताकपिठ्या विठोबाही असाच उजवा हात पुढे करून रमेजवळ ताकपीठ मागत आहे. याचा अर्थ भगवंत सुदामा, विदूर, द्रौपदी, एकनाथ, रमा यांच्याच घरी ते देतील ते खात असतो हे उघड आहे. देवाने अन्नग्रहण करावे अशी संत सज्जनांची घरे दुर्मिळ असतात एवढे मात्र खरे !

साहित्य सम्राट बंकीमचंद्र चट्टोपाध्याय यांच्या सुप्रसिद्ध आनंदमठ कादंबरीचे माझे अनेकदा वाचन झाले आहे. त्यात आपले राष्ट्रगीत 'वन्देमातरम्' आलेले आहे. महर्षि श्री अरविंदांच्या जन्म शताब्दी वर्षात, वंदेमातरम् शताब्दि वर्षात, तसेच श्री. बंकीमबाबूंच्या निर्वाण शताब्दी वर्षात माझी 'आनंदमठ' ची उजळणी झाली. त्या निमित्ताने मी देशात अनेक ठिकाणी

व्याख्यानेही दिली आहेत. जयदेवाच्या गीतागोविंदाचा संदर्भ आनंदमठात मिळतो. आनंदमठाचे उद्भवस्थान बंगालमधील वीरभूमि जिल्ह्यातील 'केंदुली' हे गांव आहे. महाकवी जयदेवाची ती जन्मभूमि आहे. वैष्णवांचे केंद्र विष्णुपूर आहे. बंकीमचंद्रांनी वर्णिलेला क्रांतिकारी संन्यासी संप्रदाय हा विष्णुस्वामी संप्रदायच असावा असे मला वाटते. 'हरे मुरारे मधुकैटभारे' ही त्यांची युद्ध घोषणा होती. सर्व संग परित्यागी साधूंनी धर्मरक्षणार्थ इस्लामी आक्रमणाबरोबर दिलेल्या शस्त्र संघर्षाची त्यातील कथा आपल्या हृदयस्पर्शी इतिहासावर चांगला प्रकाश टाकते. त्या प्रकाशात हाती शंख चक्र धारण करून कटीवर हात ठेवलेल्या पांडुरंगाची प्रतिमा अधिक उजळुन निघते. ती धर्म रक्षणासाठी आत्मसमर्पणाची प्रेरणाही देते. श्री विठ्ठलाच्या सगुण मुर्तीकडे पहाण्याचा माझा एक दृष्टीकोन सुबुद्ध वाचकांच्या विचारार्थ मी पुढे मांडला आहे.

श्री विठ्ठलाच्या सर्वात निकट असतील तर ती बडवे मंडळीच. त्यांच्यामागे अखंड चालत आलेली शतावधी वर्षांची परंपरा आहे. सेव्य सेवक भावाने ते आपली परंपरा टिकवून आहेत. त्यांच्याबद्दल समाजात बरेच काही बोलले जाते. कटु टीका टिपणीही कानी येते. काहींच्या वेगळ्या विपरीत वागण्याबद्दल सर्व समाजास दोषी धरण्याची पद्धत आपल्यात रुढ होऊ पहात आहे. श्री विठ्ठलाने दिलेली अखंड परंपरागत सेवा अनुवंशिकतेने ते सांभाळित आहेत. त्यांच्या योग क्षेमाची व्यवस्थाही त्या परंपरेने करून ठेवली आहे. विठ्ठलाशी जसा त्यांचा अतिनिकटचा संबंध आहे. तसाच पण त्याहून खुप वेगळा भासणारा संबंध प्रचंड संख्येने रांगेत उभे राहून उत्कटतेने श्रीचरण दर्शनासाठी तासन्तास उभ्या असलेल्या भक्तगणांशी आहे. देव आणि भक्त यांच्यामध्ये बडवे उभे आहेत असे दिसते. पण त्यांना विठ्ठलाचा सर्वाधिक सहवास आहे. मंदिरात अखंड त्यांचाच वावर असतो. दूरची सांप्रदायिक वारकरी मंडळी

वारीच्या निमित्ताने वर्षातून दोनदा पंढरीस येतात. नैमित्तिक मंडळी चारदा अथवा प्रति एकादशीस येतात. दूर प्रांतातून पंढरीस येणारी दर्शनार्थी मंडळी आयुष्यातून फारतर दोन चारदा येत असतील. त्या सर्वांची श्री रूप दर्शनाची उत्कट इच्छा केवळ ही निकटची मंडळी पार पाडू शकतात. पिढ्यान्‌पिढ्या देवाला खेटून ते रहात आहेत. देवळाच्या अष्टदिशांना त्यांची घरे आहेत. श्री विठ्ठलाच्या भोवती असलेल्या ह्या बडवे मंडळीच्या घरांचा वेढा पाहिला की, व्रजभूमित असलेल्या नंदगावच्या बाबा नंदाच्या वाड्याची मला आठवण येते. नंद बाबाचा वाडा टेकडीवर असून त्याला अष्टदिशांनी वेढून कृष्ण भक्त गोपांची घरे आहेत. कितीतरी गोपांच्या घरातून गेल्याशिवाय नंदाघरी जाता येत नाही. असे का ? तर त्यांच्या प्रेमस्पदाला त्रास देणाऱ्या दानवांशी आपली आधी गाठ पडावी. त्यांना नीट पारखावे. ते सज्जन आहेत याची खात्री पटल्यावरच पुढचा रस्ता दाखववावा. भगवत् दर्शन घडवावे. भगवंतापाशी पोहचण्याची वाट सर्वात अवघड असते आणि ती कठीणही असते. व्रजभूमितील श्रीकृष्ण सखे असलेल्या गोपपुत्रांची भूमिका ह्या युगात बडवे मंडळी पार पाडीत आहेत असे मी लिहीले तर ते यथार्थ ठरले.

ह्या चरित्र लेखनाचे कार्य केवळ पूर्व ऋणानुबंधामुळेच माझ्याकडे आले आहे. माझी चरित्र नायिका ही चारशे वर्षांपूर्वीच्या कालातली आहे. ह्या लेखन कार्यास उपयोगी पडतील अशी दोन तीनच कागदपत्रे मला उपलब्ध झाली आहेत. त्यांचा उल्लेख मी केलेला आहेच. हे चरित्र साधुवर्य एकनाथ महाराजांच्या कालातील आहे. एकनाथ व रमा यांच्या चरित्रात एक गूढ सूत्र निश्चित आहे. रमा ही पैठणजवळ ४-५ मैलाच्या अंतरावर असलेल्या गोदावरीच्या पैलतीरावरील मुंगी ह्या गावी जन्मलेली आहे. तिच्या माहेरची नाईक घराणे हे संत भानुदासांच्या काळापासून नाथांच्या घराशी संबंधित आहे. भानुदास-चक्रपाणी-सूर्यनारायण-एकनाथ ही नाथांची पूर्व

परंपरा आहे. मुंगीच्या विद्यमान असलेल्या श्री. वसंतराव नाईक यांच्याकडून वे. शा. सं. श्री. बाळकृष्णशास्त्री महाजन बडवे यांना मिळालेली रमेच्या माहेरच्या गत वहा पिढ्यांची श्रेय नामावली माझ्या पाहण्यात आली आहे. श्री नाथांच्या आधीपासून म्हणजे भानुदासापासूनच मुंगीच्या नाईक घराण्यांवर त्यांची कृपा आहे हे निश्चित मानावे लागते. श्रीनाथ हे रमेपेक्षा निदान ४४ वर्षांनी वडील आहेत. त्यांचा जीवनपट ६६ वर्षांचा आहे. ह्या बद्दल त्या चरित्राचे गाढे अभ्यासक डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ. शं. दा. पेंडसे प्रभूति विद्वत्जनांमध्ये एकवाक्यता आहे. रमेच्या वयाच्या २२ व्या वर्षापर्यंत श्रीनाथ विद्यमान आहेत.

श्रीनाथांच्या घरी डावा हात कमरेवर ठेवून उजवा हात पुढे करून त्यांच्याकडे लोणी खडीसाखर मागणारा विजयी पांडुरंग आजही त्यांच्या देवघरात उभा आहे. रमेच्या घरी तसाच उजवा हात पुढे करून ताकपीठ मागणारा विठोबा आज पंढरीत उभा आहे. पैठणचा विजयी पांडुरंग व पंढरपूरचा ताकपिठ्या विठोबा हे एकाच कालातले आहेत. रमेचे एकनाथांशी असलेले अंतरंग ऋणानुबंध किती खोलवर होते त्यावर ते समर्थपणे प्रकाश टाकू शकतात. श्रीनाथांचे व रमेचे निर्याण एकाच तिथीस झालेले आहे. पैठणला श्रीनाथांच्या पुण्यतिथीच्या दिवशी, नाथषष्ठीस सायंकाळी व श्रीकृष्ण जन्माष्टमीस ताकपिठ्याच्या प्रसादाचे वितरण होते हे सर्वत्र ज्ञात आहे.

श्रीनाथांची ज्येष्ठ कन्या गोदावरी ही पैठणातच मुद्गल घराण्यात दिली होती. तिचा पुत्र मुक्तेश्वर हा ख्यात कीर्ति महाकवी आहे. नाथांच्या ह्या नातवाने आपल्या माता महांची सरस्वतीची सेवा पुढे चालविली. कविवर्य मुक्तेश्वरांचा वंश काही पिढ्यांपूर्वी फलटणला स्थिर झाला. ह्या वंशातले विद्यमान पुरुष प्राचार्य डॉ. मोरेश्वर सदाशिव उपाख्य आप्पासाहेब गोसावी हे ख्यातनाम

गोखले शिक्षण संस्थेचे सचिव आहेत. ते नाशिकलाच रहातात. त्यांच्याशी माझे अनेक वर्षांचे निकटचे ऋणानुबंध आहेत. त्यांच्या देवघरात असलेल्या, श्रीनाथांच्या परंपरेतून उपास्य देवता म्हणून आलेल्या, विजयी व वरद पांडुरंग अशा दोन देवता विग्रहांचे दर्शन मी घेतले आहे. ह्या देवता विग्रहाच्या दर्शना बरोबरच श्रीनाथ कालातील अज्ञात अशा सूत्रांचे संबंध प्रा. डॉ. आप्पासाहेब गोसावी यांच्याशी झालेल्या संभाषणातून मला मिळाले आहेत. त्याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करणेही त्यांना रुचणारे नाही. श्रीनाथ महाराजांच्या असीम कृपेमुळे एक ईश्वरी संकेत म्हणून प्रा. डॉ. आप्पासाहेब गोसावी यांनी आपल्या पुण्यश्लोक शिवपार्वती प्रतिष्ठान द्वारा हे चरित्र प्रसिद्ध करण्याचे महत्कार्यही स्वीकारले आहे.

श्रीरामकृष्ण परमहंसांचे अतिसुंदर मराठी चरित्र कै. न. रा. परांजपे यांनी दोन खंडातून लिहीले आहे. ह्या चरित्र लेखकाचा निकटवर्तियांकडून मी असे ऐकले आहे की, प्रत्यक्ष श्रीरामकृष्ण परमहंस देव कै. नरुभाऊ परांजपे यांच्यापासून दोन हात अंतरावर बसुन आपले चरित्र सांगत असत. श्रीगुरुचरित्रकार सरस्वती गंगाधर यांस सिद्धाच्या रुपाने प्रकट होऊन प्रत्यक्ष श्रीगुरूंनीच आपली चरित्र गाथा सांगितली आहे.

माझे पूज्य तीर्थरुप वै. नरहर खंडेराव (दाजीसाहेब) क्षीरसागर हे गूढ अशा परलोक विद्येचे अभ्यासक होते. ह्या संबंधात त्यांची परलोक विद्या व आत्मशक्ति ही दोन पुस्तके प्रसिद्ध आहेत. देश परदेशातील परलोक विद्या अभ्यासकांशी त्यांचा संपर्क होता. श्री ज्ञानेश्वर कन्यका म्हणून प्रसिद्ध असलेल्या, मधुराद्वैत संप्रदायाचे श्रेष्ठ प्रवर्तक, विदर्भातील अंध साधू वै. श्री गुलाबराव महाराज यांचे शिष्योत्तम वै. श्रीबाबाजी महाराज पंडित यांना वै. श्री. गुलाबराव महाराजांच्या जीवन चरित्रातील गूढ प्रमेये

सोडविण्यास माझ्या पू. तीर्थरुपांनी आपल्या परलोक विदेहात सहाय्य केले होते हे मला माहित आहे. प्रत्यक्ष श्रीगुलाबराव महाराज शरीरात संचरुन ती गुढे उकलून दाखवीत असत.

ह्या सर्व ऋणानुबंधाचा विचार करता प्रत्यक्ष पांडुरंगाने कृपा केली तरच त्याला ताकपीठ खाऊ घालणाऱ्या चरित्राचे मला आकलन होऊ शकेल. तिचे दर्शन होऊ शकेल. तिने ज्याला भक्तीप्रेमाने ताकपीठ खाऊ घातले, त्या ताकपिठ्या विठोबाचे छायाचित्र मला प्रसाद भेट म्हणून मिळाले आहे. हे चरित्र लेखन करीत असताना मी ते दृष्टीपुढे ठेवले आहे. कांची कामकोटी पीठाचे ब्रह्मलीन जगद्गुरु श्रीमत् शंकराचार्य पूज्यपाद श्री चंद्रशेखरेंद्र सरस्वती स्वामी महाराज हे पंढरीस आले असताना एका पहाटे प्रत्यक्ष श्री पांडुरंगाशी संवाद झाल्याने श्रीभक्त श्री तात्यासाहेब डिंगरे यांच्याकडून मी ऐकले आहे. प्रत्यक्ष श्रीरमाचरित्र कथन करण्यास प्रारंभ करण्याच्या सुमारास वृंदावन निवासी श्रीकृष्णसखा कृष्णदासजी बडेभैय्या, श्रीमाध्वगौडेश्वर संप्रदायाचे श्रीमहंत श्रीचरणदासजी महाराज, श्रीकृष्णदासजी छोटेभैय्या सखी कृष्ण यांचे आगमन माझ्या घरी झाले. श्रीरमा चरित्राचा गूढ रम्य भाग त्यांच्याच कृपेने मला समजू शकला. नाशिकच्या चतुःसंप्रदाय आखाड्याचे वयोवृद्ध महंत श्रीदीनबंधुदासजी यांच्यासारख्या श्रीकृष्ण कृपाश्रयी साक्षात्कारी पुरुषाकडून श्रीकृष्ण लीला सहचरी भगवती श्रीमती राधेच्या अष्ट सख्यांच्या लीला चरित्राचा किंचित परिचय मला दृष्टी गोचर झाला. ह्या सर्व श्रीकृष्ण कृपाश्रयींचे ऋण केवळ शब्दांनी व्यक्त करणे मला अशक्य आहे. श्री विठोबाची मीही सतत विनवणी करतो आहे. श्रीरमेचे दर्शन मला घडावे. तिचे चरित्र मला आकळावे.

हे पांडुरंगा ! रमा उपाशी आहे हे जाणून तिच्या आर्त भक्तीमुळे तू प्रत्यक्ष तिच्या घरी गेलास. चार दिवसांच्या शिळ्या ताकांत कालविलेले लाह्याचे पीठ स्वतः खूप भुकेले आहोत असे सांगून

मोठ्या आवडीने घाई घाईने तू कसे खाल्लेस ? हे सारे मला तर समजू दे. माझी अशी खात्री झाली आहे की जिने मानवी देह धारण केला आणि जी पंढरीत रमा म्हणून नांदली ती ह्या लोकीची नाही. मागच्या युगात ती तुझी सखी होती. व्रजात विहार करणारी तुझी प्रिया होती. तूच तिला विरहिणी बनविलेस. तिच्या नकळत पंढरीत आलास. त्यामुळे विरहाने व्याकुळ झालेल्या त्या तुझ्या प्रियेला तुला शोधत शोधत पंढरीस यावे लागले. तुझ्यासाठीच तिला उपाशी रहावे लागले. पण स्वतःच उपाशी असल्याचा बहाणा करून तू तिच्या घरी आलास. तिने तुझ्यावरू रुसुन मुद्दामच चार दिवसांच्या शिळ्या ताकात कालविलेले लाह्याचे पीठ तुला खायला लावले. तू तृप्तीचा ढेकर दिलास. तुझी ही नटखट वागण्याची रीत माझ्या सारख्या पढत मुर्खाला कशी आकलन होणार ? त्यासाठी रमा बनून, गोपी होऊनच कामगंधहीन प्रेमाचा पाठ घ्यावा लागेल. ऐहिक जीवनाच्या सुखोपभोगात आकंठ डुंबलेल्या माझ्या सारख्या यःकश्चित क्षुद्र जीवाला त्या दैवी प्रेमाचे आकलन होणे अशक्य आहे. तुझ्या स्वरूपात अंतर्धान होताना रमेने आमच्यासाठी मागे ठेवलेली एक मात्र वस्तु म्हणजे ती ताकपीठाची पवित्र दगडी ! त्या दगडीला तुझा आणि रमेचा दैवी स्पर्श झालेला आहे. तिला स्पर्श करण्याचे धारिष्ट्यही माझ्यात नाही. रमेची आर्त व्याकुळताही माझ्यात नाही. रमेच्या चरणस्पर्शाने पवित्र झालेली ती वास्तु हीच आता माझा आधार ठरणार आहे. त्या वास्तुच्या आश्रयाखालीच हे व्रजविहारिणी, चिरविरहिणी, हरिप्रिये, रमे ! मी तुझ्या दर्शनास येत आहे. तुझी कृपा होऊ दे.

क्षीरसागर कारखाना,
जुना आग्रा मार्ग, पंचवटी, नाशिक – ३
श्रीगुरुपौर्णिमा शके १९१६
दि. २२.०७.१९९४

श्रीरमा विठ्ठलाचा कृपाकांक्षी,
**विष्णु नरहर क्षीरसागर**

# * ॥ यथातो ब्रह्म जिज्ञासा ॥ *

विश्व ब्रह्मांड अनंत आहे. त्याला आदि नाही व अंतही नाही. हे चराचर विश्व अखंड मंडलाकार गतीने फिरत असते. विश्व हे सप्तलोकात्मक आहे असे आपल्या ऋषींनी मान्य केले आहे. चौदा भुवनांचे अस्तित्वही आपल्या पुराणकारांनी मानले आहे. ह्या सर्व भुवनांमध्ये पृथ्वीचे स्थान असाधारण महत्वाचे आहे. पृथ्वीवर केलेल्या यज्ञयागादिमुळे, तपाच्या पुण्यसंचयामुळे मनुष्यास स्वर्गादि लोक प्राप्त होतात असे पुराणकारांनी सांगितले आहे. देवतांनाही मनुष्य देह धारण करून पृथ्वीवर जन्म घ्यावे लागले आहेत. त्यांनाही येथे यज्ञ याग तपादि पुण्यकर्मे करून उत्तम लोक प्राप्त करून घ्यावे लागतात. याचा अर्थ भूलोकाचा अन्य लोकांशी एक सूत्रबद्ध संबंध आहे. सारे विश्व हे श्रीचक्रावर आधिष्ठित आहे. तर मनुष्य शरीर हे षट्चक्रावर उभे आहे. जे पिंडात आहे तेच ब्रह्मांडात आहे असे म्हटले जाते. विश्वब्रह्मांडाचे ज्ञान प्राप्त करून घेणे हा मनुष्य जीवनाचा उद्देश आहे. ह्या उद्देशाच्या अनुभूतीसाठी आपणाकडे अनादि कालापासून मानवाचे अखंड प्रयत्न चालू आहेत.

दृष्यमान असलेले खगोलातील ग्रह, तारे, पृथ्वी हे सारे पंचभौतिक आहेत. तशीच पृथ्वीवरील प्राणी सृष्टीही पचंभौतिक आहे. ह्या पंचभौतिक जगताचे ज्ञान बुद्धीगम्य आहे. ते जाणून घेण्याची साधनेही मानवाने बनविली आहेत. ही सर्व साधने मानवाने पंचभौतिक जडवस्तूपासूनच बनविली आहेत. दृश्यमान असलेल्या आणि काही वेळा अदृष्य वाटणाऱ्या ह्या जगताचे ज्ञान वैज्ञानिक साधनांमुळे मनुष्य मात्रास होऊ शकते; परंतु त्याच्या सीमा पंचभौतिकतेमुळे मर्यादित झाल्या आहेत. वैज्ञानिक साधनांच्या

सहाय्याने मानवाने बुद्धीचा उपयोग करून विलक्षण शक्ती संपादन केली आहे असे आज प्रत्ययास आलेले आहे.

ह्या पंचभौतिक जगतातून मानवाने त्याच्या उपयोगासाठी भिन्न भिन्न प्रकारच्या अगणित वस्तु निर्माण केल्या आहेत. त्या बाहेरचे मात्र त्याला काही निर्माण करता आलेले नाही. ह्या संबंधात कांची-कामकोटी पीठाचे ब्रह्मलीन परमाचार्य पूज्यपाद श्रीचंद्रशेखरेंद्र सरस्वती महाराज एकदा म्हणाले होते की, 'ह्या प्रभुनिर्मित सृष्टीत कोणी कोणतीही वस्तु नव्याने निर्माण करू शकत नाही. फारतर त्या वस्तूचे त्याला स्थानांतर करता येईल. प्रभुइच्छेने होणारी नवनिर्मिती मात्र करता येणार नाही.' मानवाच्या कृतीला निश्चित स्वरूपाच्या मर्यादा आहेत आणि मानवाच्या निर्मिती कर्तृत्वाचे अस्तित्वही कालाने मर्यादित केलेले आहे.

अशा अवस्थेत विश्वाच्या गूढांचे परमज्ञान पंचभौतिक साधनाद्वारा होऊ शकणार नाही. आम्हाला ज्ञात झालेल्या विश्वाच्या कक्षे पलिकडे अज्ञात असलेल्या अनंत विश्वाचे अस्तित्व निश्चित आहे. त्याचे भान आम्हाला कसे होणार ? आम्ही निर्माण केलेली पंचभौतिक साधने ही विश्वामित्र निर्मित सृष्टीपुढेही अपुरी ठरतात असा निष्कर्ष ज्ञान विज्ञान संपन्न तपस्वांनी काढला आहे.

विज्ञानाधिष्ठित पंचभौतिक जगताच्या ज्ञानापेक्षा विश्व-निर्मात्याचे रहस्यपूर्ण ज्ञान आपणास झाले पाहिजे ह्या जाणीवेतून प्राचीन कालापासून मानवाचे अखंड प्रयत्न सुरु आहेत. देवता स्वयंपूर्ण तेजाने प्रकाशमान असतात. देवतांची छाया पडत नसते. देवता मानवाच्या मागे उभी आहे. मानवाला मागे डोळे नसल्याने ती दिसू शकत नाही. प्रकाशमान देवतेकडे पाठ करून मनुष्य उभा आहे. त्यामुळे माणसाच्या अज्ञानाची त्यातून मोठी असलेली सावली त्याच्याच पुढे पडत असते. तो तिच्याच मागे सतत धावत असतो.

परमात्म्याचे ज्ञान हे सामुदायिक रित्या होऊ शकत नाही. अखेरीस ते व्यक्तीगतच रहाते. असा तपस्व्यांचा अनुभव आहे. शाळेत एकाच वर्गात पन्नास मुले शिकत असतात. त्यांना
शिकविणारा शिक्षक एकच असतो. वर्गातील सर्व मुलांना एकाचवेळी तो शिकवित असतो; परंतु सर्वांची परीक्षा घेतल्यावर एकाच विद्यार्थ्याला पहिला क्रमांक मिळतो हा नेहमी येणारा अनुभव आहे. त्यामुळे ज्ञान हे व्यक्तीगत पात्र अपात्रतेवर अवलंबून असते हे मानणे भाग पडते. ज्ञानी पुरुष ज्ञान हे दुसऱ्या व्यक्तीत संक्रमित करू शकतात. ते प्राप्त करून घेऊ इच्छिणारी व्यक्तीसुद्धा कठोर तपसाधनेने युक्त असावी लागते. पंचभौतिक शरीरामुळे प्राप्त झालेली अशुद्धता नष्ट करण्यासाठी तिला उग्र साधना करावी लागते. तिला अंतर्बाह्य शुद्ध व्हावे लागते. परमज्ञान हे कृपापात्र असल्याने त्या कृपेसाठी अविरत प्रयत्न करावे लागतात. परमज्ञान हे अविच्छिन्न गुरु परंपरेने प्राप्त होते असा सिद्धांत महापुरुषांनी मांडलेला आहे.

विश्वनिर्मात्याने निर्माण केलेली सृष्टी ही एक अप्रतिम सौंदर्य संपन्न वास्तू आहे. त्याच्याच अंशाने निर्माण झालेल्या प्राणीमात्रांच्या निवासासाठी त्याने ती निर्मिली आहे. सृष्टीचा तो स्वामी आहे. म्हणून तो जीव मात्रांचाही स्वामी आहे. प्रत्येक प्राणीमात्र स्वभावतः एकमेकांशी सुसंवाद साधित असतात. ह्या सर्वांच्या नियंत्रणासाठी तो स्वतः देह धारण करून पृथ्वीवर अवतरत असतो. त्याला जाणू शकणारे अत्यल्प असतात. ते त्याची कृपा प्राप्त होण्यासाठी त्याच्याकडे धाव घेतात. व्यक्तिगत लोभाच्या मायेने बद्ध असलेले मात्र त्याला परका मानतात. त्याला विरोध करून त्याच्याशी संघर्ष करण्यासाठी उद्युक्त होतात. त्या संघर्षात अखेरीस ते नष्ट होतात.

परमात्म्याला जाणलेल्या तपोधन ऋषी मुनींसाठी आणि जाणू इच्छिणाऱ्या साधकांसाठी पृथ्वीची मनोहर वास्तु निर्मिली असल्याने ती त्यांच्या स्वाधीन करून तो अदृश्य होतो. तोच परमपिता आहे. दयाघन आहे. परम कारुणीक आहे. ही जाणीव सत्पुरुषांच्या ठायी चिरंतन असते. 'पितृदेवो भव' हे ह्या प्रतिकासाठीच मानले गेले आहे. प्रतिकातून परमेश्वर पाहाण्याची आपली परंपरा आहे.

विधात्याने प्रथम कशाची निर्मिती केली असेल तर ती धर्माची होय. यज्ञातून धर्माचा अविर्भाव झालेला आहे. धर्म यथार्थ जाणावा. त्याचे निःसंदेह अनुसरण करावे. हा परमात्म्याने मानवाला दिलेला जीवनक्रम आहे. धैर्यवान माणसेच धर्माचे यथा तथ्य परिपालन करू शकतात अशी इतिहासाची साक्ष आहे. परम धर्मिकांच्या सहाय्याला ईश्वर धाऊन येत असतो असा प्राचीन कालापासून अनुभव आहे.

----------

# * ॥ आपली जीवन धारणा ॥ *

भारत हे राष्ट्र आणि भारतीय संस्कृती कालाच्या सर्व भक्षक शक्तीवर मात करून आज जीवीत आहे. एका अर्थाने हे महान आश्चर्यच मानावे लागते. जगाच्या इतिहासात अनेक बलाढ्य राष्ट्रे व संस्कृती कालाच्या ओघात नामशेष झालेल्या आहेत. कोठेतरी एखादा व्यक्ती समुहाकडून काही भूभाग नियंत्रणाखाली आणला जातो. तेथे त्यांचे राज्य निर्माण होते. त्या लोकसमुहाची विचारधारा त्यांची संस्कृती म्हणून मूळ धरू लागतो विकसितही होते. आपल्या प्रकाशदीप्तीने ती जगाला दिपवून टाकते. त्या समुहाचे जीवन ध्येय भौतिक सुख साधनांपुरते मर्यादित रहाते. ते लवकर साध्यही होते. तेथूनच त्यांच्या अधोगतीस प्रारंभ होतो. कालांतराने ते पूर्णतः नष्ट होतात.

भारतीय संस्कृतीच्या चिरजीवनाचे रहस्य येथील समाजाच्या ध्येयाशी निगडीत आहे. आपली संस्कृती सनातन आहे. तिला वैदिक संस्कृती असेही संबोधिले जाते. राष्ट्राची जशी संस्कृती असेल तसा तेथील समाजही असतो. आपल्या समाजाचे ध्येय आपल्या संस्कृतीनेच निश्चित केलेले आहे. आपले ध्येय हे स्वप्नरंजनात्मक नाही. ते अगदी स्पष्ट आहे. विश्वाचे ज्ञान प्राप्त करून घेणे, विश्वनिर्मात्याला जाणणे, त्याला प्रत्यक्ष पहाणे, त्याचा अनुभव घेणे हे आमच्या पुढील ध्येय आहे. परमज्ञान, ईश्वरप्राप्ती हे आपण मनुष्यमात्राचे साध्य मानतो. ते प्राप्त करून घेण्यासाठी कुठलीही भौतिक साधने उपयोगी पडणार नाहीत अशी आपली खात्री झालेली आहे. ईशप्राप्ती हे चिरंतन ध्येय असल्यामुळेच ह्या राष्ट्राला चिरंजीवत्व मिळाले आहे.

ईशप्राप्तीसाठी अखंड प्रयत्नरत असलेल्या एखाद्या भाग्यवानास त्याची प्राप्ती होते. तो आपल्याला आलेला अनुभव काही सश्रद्धांना सांगतो. त्यातील जिज्ञासूंना ईश प्राप्तीसाठी काय करावे

याचा आचारधर्म ही तो सांगतो. ह्या जन्मी आपले इप्सित साध्य झाले नाही तरी निराश होऊ नका. प्रयत्न सोडू नका. पुढील जन्मी ते साध्य होईल असा विश्वास ठेवा. त्यासाठी पुनः जन्म घेण्याची तयारी ठेवा. आपल्या साध्यावरील श्रद्धा ही दृढ राहू द्या असे तो कंठरवाने सांगत रहातो. श्रद्धा ही अनंत जन्मांच्या परिपाकातून निर्माण होत असते. कोणाच्या सांगण्याने मनुष्य श्रद्धावान होऊ शकत नाही हे एक सत्य आहे.

भगवत् प्राप्ती करून घेणे हे भारतीयांचे अंतिम ध्येय आहे. त्यामुळे आम्हाला वेगळी आध्यात्मिक व पारमार्थिक दृष्टी लाभली आहे. ह्या ध्येयाला अनुसरुन येथील समाज रचना निर्माण झाली आहे. आपल्या वैशिष्ट्यपूर्ण सामाजिक रचनेमुळेच आपले राष्ट्र टिकून राहिले आहे. आपल्या समाज सहस्रावधी वर्षांची अक्षुण्णा परंपरा टिकवून आहे. आपली वर्णव्यवस्था व कुटुंबसंस्था ही सामाजिक दृढीकरणाला महत्वाचे कारण ठरली आहे. एकाच स्वभाव गुणांच्या व रक्ताच्या एकत्रित वास्तव्याने एक कुटुंब तयार होते. व्यक्ती ही कुटुंब घटक असली तरी व्यक्ती म्हणून कुटुंबात तिचे स्थान दुय्यम असते. एकमेकांवरील एकांतिक विश्वास हा कुटुंब टिकून रहाण्याचा मूलाधार असतो. कुटुंब घटकाला अन्नवस्त्राची कधीही चिंता नसे. कोणाच्याही आजारात अत्यंत आत्मीयतेने सेवा सुश्रुषेचे काम सर्व कुटुंबीय तत्परतेने प्रेमाने करीत.

आपल्या कुटुंब संस्थेचे नियंत्रण ज्येष्ठ व्यक्तीने करावे असा अलिखीत नियमच होता. भिन्न भिन्न प्रकृतीच्या सर्व कुटुंबीयांना सांभाळून नेण्याची कुटुंब प्रमुखाची हातोटी विलक्षण असावयाची. हे काम मोठ्या कौशल्याने पार पाडले जाई. कुटूंब प्रमुखाकडून सर्व कुटुंबीयाना समान वागणूक मिळे. प्रत्येक कुटुंब घटकाच्या विकासासाठी तो अखंड प्रयत्नशील राही. सर्वांसाठी झिजणे हा

त्याचा स्वभावच असे. सर्वांत प्रेमपूर्ण सुहृदभाव राखण्यावर त्याचा कटाक्ष असे. घरातील अंतर्गत व्यवहार सामान्यतः वयोवृद्ध स्त्री पहात असे. आपल्या कुटुंब संस्थेची व्याप्ती 'वसुधैव कुटुंबकम् ।' ह्या उक्तीत व्यक्त होते.

दुसऱ्यासाठी झिजणे, अखंड परोपकारात रत रहाणे हा आपला सामाजिक स्वभाव आहे. जीवनात कोठेही व्यक्तिगत स्वार्थाला जागा राहू नये. सत्याला स्मरुन सारे व्यवहार व्हावेत. प्रामाणिकपणाने सर्व व्यवहार व्हावेत. कोणाचीही फसवणूक होऊ नये याची कटाक्षाने काळजी घेतली जाई. अशा वर्तनाने सर्व कुटुंब घटकांचे सर्वकष विकसन आपोआप होत असे. व्यक्तीच्या आदर्श वर्तनावर सर्व कुटुंबियांची प्रतिष्ठा अवलंबून असावयाची.

मध्यान्नकाळी भोजनाच्यावेळी दारावर येणाऱ्या अतिथीची वाट पाहाणे हा आपला स्वभावधर्म होता. अतिथीचे भोजन झाल्याशिवाय कुटुंबीय घटक अन्नग्रहण करीत नसत. अतिथी धर्म पाळणाऱ्या समाजात कोणाची उपासमार होत असेल ह्यावर विश्वास बसू शकत नाही.

कुटुंबात व्यक्तीचे स्थान दुय्यम असले तरी व्यक्तीही कुटुंब संस्थेचा पाया मानली गेली आहे. व्यक्ती, कुटुंब व समाज ह्या चढत्या श्रेणीने आपला उत्कर्ष झालेला आहे. एका श्रीरामचंद्रांमुळे त्यांच्या दोन सापत्न माता व सापत्न बंधू उच्च ध्येयाच्या प्रेमपूर्ण सूत्रात बांधले गेले होते. माता सापत्न असल्या तरीही आपण एकाच पित्याचे पुत्र असल्याने सख्खे भाऊ आहोत ही जाणीव त्या सर्व बंधूंना होती. श्रीरामचंद्रांचे कुटुंब हा त्यावेळच्या समाजापुढे एक आदर्श वस्तुपाठच होता. पुढे त्याचीच परिणती रामराज्यात झाली हे रामायणच सांगते.

आज आम्ही सामाजिक विकसनाबद्दल खूप बोलतो. मानवी प्रयत्नांनी साधलेल्या वैज्ञानिक उत्कर्षाबद्दलही बरेच सांगितले

जाते. वैज्ञानिक शोधांमुळे मानवाला अमाप सुख समृद्धीची साधने उपलब्ध झाली आहेत. त्यामुळे तो अत्यंत सुखलोलूप व अमर्याद स्वार्थी बनला आहे. विश्वनिर्मात्या भगवंतावरील श्रद्धेला, सुखाला चटावलेली ही मंडळी अंधश्रद्धा म्हणू लागली आहेत. तथाकथित प्रगत विज्ञानाच्या प्रभावाखाली गेलेल्या पाश्चात्यांचे सारे आचार विचार आम्ही त्यांच्या अंधानुकरणामुळे स्वीकारले आहेत. त्यामुळे समाजाच्या मूलाधार असलेली आपली सर्वांग सुंदर कुटुंब संस्था आज पार धुळीला मिळाली आहे. मातृपितृ सेवेत मग्न राहिलेल्या पुंडलिकाच्या राष्ट्रात आज वृद्धाश्रम ही एक सामाजिक गरज ठरली आहे. बँकांमधील व्यक्तिगत खाती, आयुर्विमा सुरु झाला. त्याचवेळी माणूस एकमेकांवरील विश्वास गमावून बसला आहे. 'योगक्षेमं वहाम्यहम् ।' ह्या भगवत् वचनाची क्रूर विटंबनाच आमच्या आयुर्विमा निगमने केली आहे.

ह्या सर्वांच्या परिणामात देशाची महत्वाची घटक असलेली व्यक्ती ही दिवसेंदिवस अत्यंतिक स्वार्थी, सुखलोलूप, अविवेकी, दुर्व्यसनी व भ्रष्ट होत चालली आहे. हे कोणीही ध्यानात घेत नाही. आपले सारे प्रयोग उलटे चालले आहेत. व्यक्तीचा अहंकार अमर्याद वाढल्याने कोणालाही कौटुंबिक व सामाजिक बंधने नकोशी झाली आहेत. त्यामुळेच अधःपतितांना प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे आणि अपवाद हेच नियम बनू लागले आहेत. ज्या समाजात अखंड सत्पुरुषांची मालिकाच निर्माण होत आली आहे. त्या समाजाची आजची अवस्था भयानक अस्वस्थता निर्माण करीत आहे.

---------

# ॥ चिरंजीवतेचा हुंकार ॥

भारतीय संस्कृती ही पृथ्वीवरील प्राचीनतम संस्कृती आहे असे आपण मानतो. आपली ही संस्कृती कालाच्या ओघात नामशेष झालेली नाही. ती चिरंजीव आहे याचा यथार्थ गर्वही आपल्याला आहे. वर्तमान कालात संपर्क साधनांमुळे जग अगदी लहान झाले आहे. चारी खंड पृथ्वीवर अल्पावधीत आपण कोठेही पोहोचू शकतो. क्षणात कोठेही संपर्क साधू शकतो. आजच्या काळात परदेशात गेल्यावर आपल्या प्राचीन संस्कृतीचे गोडवे आम्ही तिकडे गाऊ लागतो, त्यावेळी तिकडची माणसे आमच्याकडे बघुन हसू लागतात; कारण आजचा भारत हा आपल्या प्राचीन संस्कृतीचा वारसा चालविणारा नाही तर तो पाश्चात्य आचार विचारांच्या पूर्णतः आहारी गेलेला आहे. राज्य घटनेपासून, विधिनियमांपासून तो समाज धारणेपर्यंत पूर्णतः पाश्चात्यांचे अंधानुकरण करण्यात मग्न झालेला आहे. एका अल्पजीवी संस्कृतीचे व्यर्थ अनुकरण करण्यात आम्ही रात्रंदिन गढलेलो आहोत.

मी भारताबाहेर कोठेही गेलो नाही. मला तशी सवडही नव्हती. शक्यता तर नव्हतीच नव्हती; परंतु जपान, युरोप, अमेरिका आदि खंडातील काही विद्वज्जनांशी माझा संपर्क आहे. काहीशी व्यक्तिगत परिचय ही आहे. साधारण वीस वर्षांपूर्वी कॅलिफोर्नियातील प्रसिद्धी विदुषी डॉ. ॲन्टोनित् बोट्सफोर्ड एप्स्टाईन ही भारतात आली होती. माझ्याकडे काही काल तिचे वास्तव्य होते. कांची कामकोटी पीठाचे जगद्‌गुरु शंकराचार्य ब्रह्मलीन श्रीचन्द्रशेखरेन्द्र सरस्वती स्वामी महाराजांच्या दर्शनास ती माझ्या बरोबर कांचीपूरमला आली होती. सात वेळा तिने जगाचा प्रवास केला होता. जगाच्या इतिहासाचा तिचा अभ्यास होता. फ्रान्समध्ये तिने पुरातत्व संशोधन केले होते. सुक्ष्म चिंतन करण्याची तिची बुद्धिमता, मुलग्राही तत्वांना स्पर्श करणारे तिचे

विचार, लोकोत्तर संपन्न प्रतिभा, प्रत्ययकारी अनुभव संपन्नता हे पाहून कोणाचीही मती कुंठित व्हावी असे तिचे दर्शन होते. माझ्याशी तिचा एका प्रसंगाने प्रश्नोत्तर रूपाने झालेला संवाद सारांश रूपाने पुढे देत आहे.

तिने प्रश्न विचारला की, 'तुमची संस्कृती प्राचीनातली प्राचीन आहे असे येथील विद्वान सांगतात. पण त्या प्राचीनतेचे पुरावे मात्र प्रत्यक्ष उपलब्ध होत नाहीत. भारतात फारसे जुने अवशेष दिसत नाहीत. जे दिसतात ते साधारण दीड दोन सहस्त्र वर्षांच्या कालातील आहेत. युरोपात ग्रीसमध्ये ग्रीकांच्या जुन्या संस्कृतीचे अवशेष पहावयास मिळतात. रोमच्या परिसरात जुन्या रोमन संस्कृतीचे अवशेष तेथील भव्य नाट्यगृहे, प्रचंड स्तंभ आपल्या प्राचीनतेची साक्ष देतात. इजिप्तमध्ये तेथील पिरॅमिडस्, स्फिंस सहा सहस्त्र वर्षांपूर्वीच्या जुन्या मिसर संस्कृतीवर समर्थपणे प्रकाश टाकतात. इतके जुने अवशेष भारतात दिसत नाहीत. मग तुम्ही जगात प्राचीनतम आहात असा डांगोरा कां पिटता ?' त्यावर मी तिला विचारले, 'तुला कोणते अवशेष दिसायला हवेत ?'

तिने त्याचे स्पष्टीकरण करताना सांगितले की, 'आज अयोध्येच्या परिसरात रामायण कालातील अवशेष दिसत नाहीत. रामचे धनुष्य कोठे जपून ठेवलेले दिसत नाही. त्यावेळची लंका तर कोठेच दिसत नाही. श्रीरामचंद्रांनंतर सव्वीस पिढ्यांनी श्रीकृष्ण झाले. त्यांच्या द्वारकेचा तपास करण्यास मी आजच्या द्वारकेस गेले. तेथील लोकांनी मला सांगितले की, श्रीकृष्णाची द्वारका त्याचवेळी समुद्रात बुडून गेली. त्यांची आयुधेही कोणी जपून ठेवली नाहीत. जिथे प्रत्यक्ष पुरावा काहीच सापडत नाही अशी तुमची संस्कृती प्राचीन कशी ?' ह्या तिच्या प्रश्नाचे मला हसू आले. मी काही बोलत नाही असे पाहून ती पुढे म्हणाली, 'कां हसलात ? सरळ उत्तर का देत नाही ? आपल्या बुद्धीचे भांडवल संपले की इकडचे लोक हसून

वेळ मारून नेतात असा माझा अनुभव आहे.' आणि ती एकदम गंभीर झाली.

त्यावर मी शांतपणाने म्हणालो की, 'त्या लोकांपैकी मी नाही. बुद्धी दाता हा भगवान असल्याने माझ्या बुद्धीला मिळणारी प्रेरणा ही त्याच्यापासून आहे. मी स्वतःच तुला काही सांगावे असा व्यक्तिगत अहंभाव माझ्यापाशी नाही. पण तुला येथे नक्की काय शोधायचे आहे ते तरी नीट समजू दे ! इथल्या प्राचीन संस्कृतीचे अवशेष तुला बघावयाचे आहेत. जसे ग्रीस, रोम, इजिप्तमध्ये दिसले तसे ? अवशेष पहाण्यासाठी मुळात ती संस्कृती संपावी लागते. जुना ग्रीस आज नाही. रोममध्ये त्यावेळची रोमन संस्कृती नाही व त्यावेळची परंपरा सांगणारे लोकही नाहीत. इजिप्तमध्ये तर आज वेगळे अरब राष्ट्र उभे आहे. ह्या सर्वांच्या जुन्या संस्कृतीमागेच संपून इतिहासजमा झाल्या आहेत.'

त्यावर तिने विचारले, 'मग तुमचे काय ?'

मी उत्तरलो, 'आमची संस्कृती जिवंत संस्कृती आहे. मृत संस्कृतीचे अवशेष शोधावे लागतात जीवीत असलेल्यांचे नाही. येथील संस्कृतीचे अवशेष तुला शोधून सापडणारे नाहीत. त्यासाठी तुला आमची हृदये तपासावी लागतील. आमची संस्कृती नित्यनूतन भासणारी आहे. पण हृदये प्राचीन आहेत. आमची आजची सीता जिवंत असून ती कदाचित आपल्या अतिथी धर्मानुसार तुझ्यासाठी पाक सिद्धी करीत असेल आणि राम कोठल्या तरी शरीराचा आधार घेऊन तुझ्याशी संवाद साधीत असेल. केवळ परमज्ञान व भगवत् प्राप्ती हे ज्या संस्कृतीचे ध्येय आहे तीच चिरंतन टिकते.'

कालांतराने ही अमेरिकन विदुषी पूर्णत्वाने भारतीय झाली. सरस्वती भारद्वाज हे नाव तिने धारण केले. आपल्या विचार दर्शनात ती म्हणते, 'मी धर्मांतर केलेले नाही. धर्मांतरावर माझा विश्वासही नाही. श्रीभगवंताच्या प्राप्तीसाठी माझे मन उत्क्रांत होऊन माझ्या

हृदयात दैवी भावनांचे संक्रमण झाले आहे. ज्या कोणाला ईश कृपा हवी असेल, भगवत् दर्शन व्हावे असे वाटत असेल त्याने भारतीय जीवन पद्धतीचा अंगीकार करावया हवा. खऱ्या अर्थाने भारतीय व्हावे. येथील वर्णाश्रमाची समाज व्यवस्था ही परमज्ञान प्राप्तीसाठी भगवंताने निर्माण केलेली एक व्यवस्था आहे. ती ज्यांच्यात नाही ते सर्व असुरी लालसेपायी नष्ट झाले आहेत '





# ॥ इतिहासाचे कालचक्र ॥

कालचक्र आपल्या गतीने अखंड फिरत असते. त्याची गतीही विलक्षण असते. प्रकाशानंतर अंधारी रात्र सुरु होते. इतिहासात ती काळरात्र ठरते. त्या कालरात्रीच्या परिसीमेत मध्यरात्रीच्या अन्धःकारांत ब्राह्ममुहूर्ताची चाहूल असते. पहाट येते आणि थोड्याच वेळात प्रकाशाच्या आगमनाची चिन्हे दाखविणारी पूर्वा आरक्त होते. श्रीभगवदीच्छेने चालणारी ही कालचक्राची करणी सामान्य माणसाला चक्राऊन टाकते, संभ्रमात टाकते. द्रष्ट्या पुरुषांना मात्र तिची जाण असते.

"ज्ञानदेवे रचिला पाया । उभारिले देवालया ।
नामा तयाचा किंकर । तेणे केला विस्तार ।
जनार्दनी एकनाथ । स्तंभ दिला भागवत ।
भजन करा सावकाश । तुका झालासे कळस ।।"

साधूवर्य तुकाराम महाराजांच्या प्रशिष्या बहिणाबाई यांचा हा अभंग प्रसिद्ध आहे. त्यात त्यांनी कथन केलेले मंदिर उभारणीचे रूपक आपल्या विचारचक्राला चांगलीच गती देते. श्रीज्ञानदेवांच्या कालातील महाराष्ट्राच्या सुख समृद्धीचे वर्णन मोठे विलोभनीय आहे. अत्यंत सुसंपन्न असलेला हा देश त्यावेळी वैभवाच्या शिखरावर होता. महाराष्ट्रावर अधिराज्य असलेल्या देवगिरीचे राज्य श्री ज्ञानदेवांनी प्रत्यक्ष पाहिले आहे.

भारत एका अर्थाने एक सुंदर देवालय आहे. भगवंताचे इहलोकीचे निवासस्थान केवळ भारतच आहे. जेथे देव असतो त्या वास्तूला देवालय असे म्हटले जाते. श्रीज्ञानदेवांनी संकल्पपूर्वक नव्या देवळाची पाया भरणी केली. त्यांच्या बांधणीचे कार्य पुढे अखंड तीनशे वर्षावर चालले. श्री तुकोबारायांनी त्यावर कळस चढविला. मानवी शरीर धारणेचे जे महत्तम कार्य भजन करणे ते सावकाश

करायला सांगितले; कारण भजन करणारे मृत्युभयापासून नेहमीच मुक्त असतात.

श्री ज्ञानदेवांचा काल हा महाराष्ट्राच्या इतिहासातील अत्यंत समृद्धीचा काल होता. देवगिरी ही राज्याची राजधानी होती. यादव वंशाचे अधिराज्य ह्या परिसरात होते. भावार्थ दीपिकेच्या अखेरीस 'येथ यदुवंश विलासु । जो सकळ कळा निवासु । न्यायाते पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्रु ।। (ज्ञा. १८-१८०५) असे सांगुन त्यांनी श्री रामदेवरायांबद्दल आदर व्यक्त केला आहे. सत्ताधीशांची स्तुती अकारण करणारे श्री ज्ञानदेव नव्हते. पंढरपूरच्या श्री विठ्ठल मंदिरातील सुप्रसिद्ध चौऱ्यांशीच्या (शके ११९५) शिला लेखात श्री विठ्ठल देवरायाच्या पुजा अर्चेसाठी दाने दिलेल्यांची नावे खोदलेली आहेत. त्यात राजे रामदेवराय आणि त्यांचे प्रधान हेमाडपंत यांची नावे मध्यभागी खोदली आहेत. रामदेवरायांचे बिरुद लिखित करताना तेथे 'पांढरीफडमुख्य' असे खोदलेले आहे. पंढरपूरचा भागवत धर्मीय वारकरी संप्रदाय हा अनेक फडांनी घट्ट गुंफलेला आहे. त्याचे मुख्य फडकरी रामदेवराय होते. त्यांचे प्रधान हेमाडपंत हेही पंढरीनाथाचे भक्त होते. वारकरी होते यात किंचीतही संदेह राहू नये.

श्रीज्ञानदेवांच्या काळात द्राक्षवेलीला रसाळ फळे यावीत म्हणून तिच्या मुळाशी दूध घालण्याची प्रथा होती. 'जेव्हा द्राक्षी दूध घातले । तेव्हा वाया गेले गमले । परि फळपाकी दुणावले । देखिजे जेवी ।।' (ज्ञा. १५-५९२) हा उल्लेख भावार्थ दीपिकेतच आला आहे. त्यावेळी सोने इतके स्वस्त होते की, सोन्याला साडे पन्हेरे असे म्हटले जात असे. श्री रामदेवरायांचे करणाधीप हेमाद्रिपंडित हे हेमाडपंत ह्या नावानेही ओळखले जातात. मराठीची लघुलिपी मोडी हिचे ते जनक होत. ते विख्यात शिल्पीही होते. त्यांच्या शिल्प पद्धतीने बांधलेली हेमाडपंती मंदिरे महाराष्ट्रात सर्वत्र आहेत.

पैठणास श्री ज्ञानदेवांना शुद्धीपत्र लिहून देणारे पंडितराज बोपदेव हे रामदेवरायांच्या राजसभेतील एक अमोल रत्न होते.

देवगिरी एका आंत एक भक्कम तटबंदी असलेला दुर्ग. दोन खोल खंदक असलेला, युद्ध शास्त्र दृष्ट्या थोड्याशा सैनिक सामर्थ्यावर शत्रूला थोपवून धरुन दाद न देणारा असा हा अजेय दुर्ग आहे. श्री ज्ञानदेवांसारख्या द्रष्ट्या पुरुषाने निश्चितच जाणले होते की, बाह्य दृष्ट्या देवगिरीची तटबंदी भक्कम दिसत असली. ती बळकट दुर्भेद्य आहे असे वाटत असले तरी तिला आतून अदृश्य अशा चिरा पडल्या आहेत. तडे गेलेले आहेत. त्यामुळे ही तटबंदी कोसळण्या आधी खोलवर खणलेल्या पक्क्या पायावर देवालय उभारण्याचा संकल्प करून ते काम सिद्धीस नेले पाहिजे, पाया रचण्याचे काम आपल्या जीवन कालातच पूर्ण केले पाहिजे.

श्री ज्ञानदेवाच्या अंतर्दृष्टीला जे दिसले ते कालाने अनुभवास आणून दिले. ते समाधी घेण्याआधी दोन वर्षे अलाउद्दीन खिलजीने देवगिरीला विळखा घातला. देवगिरीवर भयानक आक्रमण केले. थोड्याच कालात देवगिरी हतबल ठरुन अपमानित होऊन शत्रूच्या आधीन झाली. कालचक्राच्या गतीने कालरात्रीची सुरुवात झाली. आपल्या स्वातंत्र्य सूर्याला राहू गिळू लागला.

पण हे दुर्दैव कसे उद्‌भवले ? इतिहासाचे लेखनिक लिहितात की, देवगिरीच्या धान्य कोठारात धान्याऐवजी चुकून मिठाची पोती भरली गेली म्हणून शत्रूच्या वेढ्याच्या विळख्यात सापडलेल्या देवगिरीच्या लोकांची उपासमार झाली. अन्नान्नदशा झाली. त्याच्या परिणामात देवगिरीचा पाडाव झाला. ही घटना कशी घडली हे जाणून घेण्यासाठी कोणत्याही ज्योतिषाची आवश्यकता नाही. देवगिरीच्या धान्य कोठाराचा कोठारीच शत्रूला वश होऊन धान्याऐवजी आपल्या कोठारात मीठ भरू लागला तर देवगिरीच्या पत्रिकेत पराजयाचा प्रारब्ध योग निश्चित झालेला होताच. अर्वाचीन

कालात शत्रूला वश होऊन राष्ट्र घात करविणाऱ्या वृत्तीचे हे प्रथम दर्शन देवगिरीत घडले. नंतर ती परंपरा तशीच चालत राहिली.

आपण हिंदूसमाज हा अध्यात्मिक जीवन धारणेचा आहे. तो श्रद्धावान आहे. साधुसंतांना तो भगवत् स्वरूप मानतो. त्यांचा भक्त बनतो. त्यांची सेवा करतो. साधूला जात, कुळी, वंश, धर्म, देश-विदेश यांचे बंधन असत नाही. 'जयासी भिक्षेचा अभ्यास । तयासी वाटे ना परदेश । जिकडे तिकडे स्वदेश । लोकत्रयी ।।' असे भिक्षा उपजीवी साधूबद्दल समर्थ रामदास स्वामींनी लिहिले आहे. मात्र श्रीसमर्थांच्या दृष्टीने हे भिक्षा पात्री साधू त्यांचे रामदासी शिष्य आहेत. अन्य परधर्मीय नाहीत हे निश्चितच !

हिंदू समाजात साधूसंतांबद्दल परम आदराची भावना आहे. ही आमची नाडी परीक्षा भारतावर आक्रमण करू इच्छिणाऱ्या परकीय इस्लामीयांनी बरोबर केली होती. त्यांच्या नृशंस आक्रमणाच्या आधी त्याचे अग्रदुत साधू वेशात भारतात येऊ लागले. शहाबुद्दीन घोरीने भारत सम्राट पृथ्वीराज चौहानांच्या कालात आपल्या मातृभूमीवर जे आक्रमण केले त्याआधी ख्वाजा मोईनुद्दीन चिस्ती हा सुफी साधू अजमेरला येऊन थांबला असे आपला इतिहास सांगतो. राजा पृथ्वीराजांचे शरीर रक्षक तर त्याला वश झालेच; पण महाराजांच्या अंतःपुरापर्यंत ह्या परकीय साधूचे हात पोहोचले होते. राजा पृथ्वीराजांची असावधानता जाणून व्यक्तिगत अपमान हा राष्ट्र द्रोहात परिवर्तित झालेला, शहाबुद्दीन घोरीचा आमंत्रक जयचंद, हा ह्याच परकीय साधूचा चेला होता. कालांतराने असाच एक साधू हजरत नझिमुद्दीन प्रत्यक्ष दिल्लीत जाऊन बसला. पुढे अल्लाउद्दीन खिलजी देवगिरीवर येण्याआधी त्याचा साधूवेशातला अग्रदूत जर्जरी बक्ष दक्षिणेत आला. तो देवगिरीच्या पायथ्याशी खुलताबादेत विसावला. जन सामान्यांना भुलविणारे, लोकांची क्षणिक दुःखे दूर करणारी छा छू करण्याची किमया ह्या तथाकथित साधूंजवळ होती.

इतिहास असे सांगतो की, अल्लाउद्दीन खिलजीला देवगिरीत जी अमाप संपदा मिळाली. त्यातील बराच मोठा भाग हा त्याच्या ह्या अग्रदूतांस मिळाला आणि त्यानंतर त्याच्या पुढील आकांक्षा सिद्ध व्हाव्यात म्हणून महाराष्ट्रात सातशे परकीय मलंगांची टोळधाड इतस्ततः धर्म प्रसारार्थ भ्रमण करू लागली.

महाराष्ट्रात बराच काळ राहून वारकरी संप्रदाय व विठोबा यांचा खोलवर अभ्यास केलेले पाश्चात्य विचारवंत डॉ. डलरी यांचा 'कल्ट ऑफ विठोबा' हा ग्रंथ अभ्यास करण्याजोगा आहे. हिंदूंची मंदिरे व देव उध्वस्त करणाऱ्या कोणत्याही मुसलमानी सत्तेची स्वार्थाकरता सेवा करणारे मुत्सद्दी व सरदार यांच्या विषयी डॉ. डलरी यांनी आश्चर्य प्रगट केले आहे. कोणत्याही राष्ट्राभिमानी माणसाला आश्चर्यच काय पण लाज वाटावी असा आपला इतिहास आहे. श्री शिवाजी महाराजांना ह्या स्वार्थी प्रवृत्ती विरुद्ध प्रथम खंड उपसावे लागले हे ऐतिहासिक सत्य आहे.

कालचक्राच्या भ्रमणातील त्या भयानक कालरात्रीत घडलेल्या उत्पातांचा अधिक ऊहापोह करावा हे ह्या पुस्तकाचे प्रयोजन नाही. त्या कालात झालेले विध्वसन आजही देशात अवशेषांच्या रुपाने शिल्लक आहे. हिंदू शुर होते पण कुर नव्हते. युद्ध सैनिका सैनिकात व्हावे अशी आपली युद्धनीती होती. नागरी जीवनाला युद्धाचा उपसर्ग पोहोचू नये हा दंडक आपले पूर्वज पाळीत असत. समाजाची श्रद्धास्थाने छिन्न छिन्न करुन लुटण्याची आपली परंपरा नव्हती. पराजितांच्या स्त्रीयांना सन्मानपूर्वक वागविण्याची आपली रीत होती. स्त्रीला देवता मानणाऱ्या आपल्या समाजाने स्त्रीयांची विटंबना कधीही केली नाही आणि सर्वांत महत्वाचे म्हणजे आपल्या पूर्वजांनी कधीही कोणावर आक्रमण केले नाही.

---------

## ❋ ॥ पहाटेची चाहूल ॥ ❋

इतिहासाचे अभ्यासक एखाद्या देशाचा इतिहास अभ्यासित असताना सामान्यतः घटनात्मक गोष्टींची नोंद घेतात. शक संवतांनी क्रमशः नोंदलेल्या घटना प्रत्येक राष्ट्रात घडत असतात. कालांतराने त्यांच्या संकलित नोंदी त्या राष्ट्राचा इतिहास बनतात. घटनात्मक इतिहास तसा समजावयासही सोपा असतो. भारतालाही इतर राष्ट्रांप्रमाणे घटनात्मक इतिहास आहेच. बुद्ध पूर्वकालापासून म्हणजे साधारण अडीच सहस्र वर्षांपूर्वी पासून आपला क्रमबद्ध घटनात्मक इतिहास उपलब्ध आहे. जगात सामान्यतः इतिहासाचे मोजमाप खिस्तपूर्व व खिस्तोत्तर कालाच्या परिमाणानी मोजले जाते. भारत हे प्राचीन राष्ट्र असल्याने खिस्तापूर्वी बुद्धदेव हे काही शतके आधी जन्मलेले आणि पूर्वेकडे सुदूर त्यांचे मत मान्यता पावलेले असल्याने इतिहासाच्या कालमापनासाठी मी त्यांना परिमाण मानले आहे.

भारताचा घटनात्मक इतिहास पहात असताना त्यांचे इतरांहून असे पृथकत्व लगेच जाणवते. येथील संस्कृतीने आपला घटनात्मक इतिहास घडविला आहे हे ध्यानात येते. आपली संस्कृती ही सनातन वैदिक संस्कृती आहे, ती अनादि आहे. प्राचीनतम आहे. प्रयागच्या अक्षय वटवृक्षासारखी आहे. आपली संस्कृतीच आपला इतिहास घडवित असते. ह्या संस्कृतीने सर्वोच्च विकसनाचा रामराज्याचा काळ पाहिला आहे. तसेच भयानक अत्याचारांच्या प्रचंड विध्वंसनाच्या काळरात्रीही अनुभवल्या आहेत. त्या रात्री कित्येक शतके व्यापून राहिल्या होत्या. आपल्या अनादि चिरंजीव संस्कृतीरूपी विशाल वटवृक्षाचा विशेष हा की, तो अतिविशाल जगद्व्यापी असल्याने भक्कमपणाने उभा आहे. त्याला पोसणारी त्याची जडमूळे आम्हाला दिसत नसली तरी ती भूगर्भात खोलवर सुदूर पोहोचली आहेत. आमच्या अध्यात्मविद्येच्या जडमूलांच्या

आधाराने हा सांस्कृतिक वटवृक्ष निर्भरपणाने उभा आहे. आपली अदृष्य अध्यात्मविद्या संस्कृतीला परिपुष्ट करीत असते आणि संस्कृती घटनात्मक इतिहास घडवित असते आणि भारतीय इतिहासाचे हे कालचक्र संथ गतीने सतत फिरत असते.

परकीय इस्लामी आक्रमणामुळे आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याला खग्रास ग्रहण लागले होते. भयानक काळरात्र अनुभवास येत होती. त्याचवेळी भावी उत्कर्षाची प्रसाद चिन्हे असलेली पहाट जवळ येत होती. आपल्या उज्वल भवितव्याची बीजे ह्या भूमित रुजविली जात होती. पारतंत्र्याच्या घनांधःकारी स्वातंत्र्याच्या पहाटेच्या प्रसव वेदना सुरु होतात. आपल्या अध्यात्म विद्येला संजीवित करणाऱ्या धर्मपुरुषाच्या अवतरणाची ती प्रसाद चिन्हे असतात. हे धर्मपुरुष त्या अमृत संजीवनीचा वर्षाव सर्व समाजावर करीत असतात. येणाऱ्या उषःकालाची जाणीव देणारा कुक्कुट आरव वातावरणांत घुमू लागला होती. विदर्भातील लाडाच्या कारंजास एक देवमानव पृथ्वीवर अवतरत होता. तो देवमानव म्हणजे श्रीगुरुचरित्राचे महानायक श्रीदत्तावतार श्रीनरसिंह सरस्वती हे होत. त्यांच्या जन्मापासून महाराष्ट्राच्या अवनत होत असलेल्या इतिहासाची दिशा बदलली. तो उन्नतीकडे झेपावू लागला, हे प्रकरण लिहीत असताना नाशिक पंचवटीतील गोदातटी असलेल्या वशिष्ठाश्रम अग्निआखाड्याचे स्थानापति पूज्यपाद श्रीमहंत श्रीकालिकानंद स्वामी महाराज यांच्याशी श्रीदत्तावतार व श्रीगुरुचरित्रावर चर्चा करण्याचे महत्‌भाग्य मला लाभले. त्यांच्या नित्य उपासनेत श्रीगुरुचरित्र आहे. श्री नरसिंह सरस्वती महाराजांचा कृपा पूर्ण प्रसाद त्यांना लाभलेला आहे. श्री स्वामी महाराज काशीच्या विख्यात पंडीत घराण्यातील आहेत. त्यांचे शिक्षण केंब्रिज, प्रयाग व आग्रा विश्वविद्यालयात झालेले आहे. पूर्वजीवनात ते श्रेष्ठ वैमानिक होते. ह्या महापुरुषाबरोबर झालेल्या चर्चेत श्रीगुरुचरित्रातील महत्वाची गूढे मला उकलली गेली.

श्री नरसिंह सरस्वतींच्या जन्माआधी त्यांच्या मातेने शनिप्रदोषाचे कठोर व्रत केले होते. तिचे स्मरण करताना एक गोष्ट ध्यानात येते की, ऐहिक जीवनाच्या सुखाची परिपूर्णता अनुभवण्यासाठी धडपडणारा आजचा मानव हा देवदत्त मनुष्यत्वाला अति कृत्रिम व यांत्रिक बनवीत आहे. वस्तुतः मनुष्यत्व हे संयमित, सुसंगत, व्रतस्थ व धर्मनिष्ठ आचारामुळे देवत्वाकडे नेणारे असते. त्या देव जीवनाच्या संस्कारमय तपोनिष्ठेतूनच श्रीरामचंद्र, श्रीकृष्ण, श्री ज्ञानदेव व श्री नामदेव आदि जन्म घेत असतात आणि त्यांच्या मातापित्यांना देवदुर्लभ धन्यता व परमसौभाग्य प्राप्त होत असते. आपली परंपरा ही इहवादी विज्ञाननिष्ठ सुखोपभोग प्रवण नसुन विज्ञानापलीकडे असलेल्या ज्ञाननिष्ठ देवदत्त तपाशी संबंधित असल्याने प्रत्यक्ष ईश्वरावताराने जिला आई म्हणून हाक मारावे अशा अनंतगुण संपन्न सुखदामिनी मातृत्वाच्या मांगल्याशी ती संबंधित आहे. ह्या विचारांचे आज विस्मरण होत चालले आहे. हे दुःखद तसेच चिंताजनक होय !

श्रीनरसिंह सरस्वती स्वामी महाराजांचे चरित्र श्रीगुरुचरित्रात ओवीबद्ध झाले आहे. वस्तुतः ते त्यांचे आत्मचरित्रच आहे. स्वतःसिद्धाच्या रुपाने प्रगट होऊन ते ग्रंथलेखक सरस्वती गंगाधर यांना सांगितले आहे. आपल्या उपासना ग्रंथात श्रीगुरुचरित्राचा समावेश झालेला आहे. श्री एकनाथ महाराजांचे गुरु श्री जनार्दन स्वामी हे दत्तानुगृहीत होते. श्रीनाथांनाही दत्तदर्शन झालेले होते. श्री जनार्दन स्वामींना अनुग्रह देणारे व श्री नाथांना दर्शन देणारे दत्त हे नरसिंह सरस्वतीच असावेत असे मला वाटते. श्रीगुरुचरित्रात श्रीशैल्यास कृष्णेत पुष्पासनावरुन कर्दली वनात अंतर्धान पावलेले श्रीगुरु नरसिंह सरस्वती स्वामी हे नंतर गेल्या शतकांत त्याच देहाने आळंदीस आले. असे ब्रह्मर्षी आण्णासाहेब पटवर्धन सांगत असत.

त्याच आधारावर जनार्धन स्वामी व नाथांवर कृपा करणारे दत्त म्हणजे स्वामीच असावेत अशी माझी इच्छा आहे.

मानवी सेवेत असलेल्या सायंदेवाला अनुग्रह देताना अविंधांपुढे पुनःमान वाकविणार नाही असे श्रीगुरुंनी कबुल करुन घेतले होते. बहामनी राज्याचे केंद्र गुलबर्गा येथून जवळच श्रीक्षेत्र गाणगापूरला श्रीनरसिंह सरस्वतींचा वास बराच काल झाला तो निश्चीत हेतु ठेवूनच असावा, त्याकाळी आपल्या कुळाची उपासना सोडून दावल मलकांना भजणाऱ्या हिंदूंची संख्या मोठी होती. अशाच काळात बिदरच्या बादशहाला आपला भक्त बनविणारे नरसिंह सरस्वती हे एक आश्चर्यच होते. त्यांचे चरित्र पारतंत्र्याच्या घनांधःकारात स्वातंत्र्याचे एक दैवी प्रसाद चिन्हच होते.

दत्त संप्रदाय हा अत्यंत कर्मठ आचारांचा आहे. सांप्रदायिक मंडळी आचारधर्म मोठ्या कठोरतेने पाळत असतात. आचार पाळण्यातील पीळ गेला, आग्रह संपला की समाजावर त्याचा विपरीत परिणाम होतो. सामान्यतः सुखलोलुप माणसे ही परकीय सत्ताधीशांच्या आहारी जातात. स्वार्थवश होऊन ते जेत्यांची भाषा, वेशभूषा, खानपान आदि पद्धती अनुसरतात. तसे करण्यात आपण काही विशेष करीत आहोत असा त्यांचा अहंकार वाढतो; त्यामुळे आपण आपले स्वत्व गमावितो आहोत हे त्यांच्या ध्यानात येत नाही. ते परधार्जिणे बनतात. आपली राष्ट्रीय अस्मिता नामशेष होते. ह्या संबंधात एक उदाहरण विचार करण्याजोगे आहे. माळवा प्रांत आपल्या नियंत्रणात आल्यावर तेथील बहुतांश लोक इस्लामी संस्कृतीच्या आहारी जाऊन त्यांचे आचार, विचार, भाषा आदि इस्लामी वळणावर गेल्या आहेत. हे पेशव्यांच्या ध्यानात आले. म्हणून त्यांनी आज्ञापत्र काढले की, 'महाराष्ट्रीयांनी आपले खाणे-पिणे, आचार-विचार, वेशभूषा इत्यादी गोष्टी महाराष्ट्रीय पद्धतीनेच केल्या पाहिजेत.' मालव प्रांताचे तत्कालीन प्रशासक

सरदार पवार यांच्या स्वाक्षरीचे असे एक आदेशपत्र ऐतिहासिक कागदपत्रात सापडले आहे. राष्ट्रीयत्व सतत जागृत ठेवावे लागते. त्यासाठी असा पीळ असणे अगत्याचे आहे.

पारतंत्र्याच्या अखेरच्या कालात एक कर्तृत्व संपन्न पिढी जन्माला येत असते. प्रतिकूल परिस्थिती बरोबर तिला अटीतटीचा संघर्ष करावा लागतो. प्रसंगी भयानक देह दंडही सोसावा लागतो. स्वातंत्र्योत्तर कालातील पहिली पिढी निर्माण करण्याचे श्रेय ह्या पुरुषोत्तमांकडे जाते. अर्वाचीन कालात असे पुरुष म्हणून क्रांतीवीर वासुदेव बळवंत फडके, लोकमान्य टिळक आणि स्वातंत्र्यवीर सावरकर यांचा नामनिर्देश करणे आवश्यक वाटते. ज्या इतिहासाच्या कालखंडाचा मी ऊहापोह या पुस्तकात करीत आहे; त्या कालातील पुरुष श्रेष्ठ म्हणजे देवगिरीचे दुर्गाधिपती श्रीजनार्धन स्वामी महाराज, त्यांचे सत्‌शिष्य श्री एकनाथ महाराज आणि श्री शिवाजी महाराजांचे तीर्थरुप श्री शहाजी राजे हे होत.

श्री जनार्दन स्वामी व शहाजीराजे हे तर प्रत्यक्ष परकीय सत्तेच्या सेवेत महत्वाच्या जागी होते. शहाजीराजांचे दरबारी कवी जयरामदास पिंड्ये यांनी आपल्या राधामाधव विलासचंपूत राजाची दैनंदिन वागण्याची रीतच दिली आहे. शौर्य, युद्धकर्तृत्व, व्यवहारातील एकांतिक प्रामाणिकपणा हे गुणविशेष जनार्दन स्वामी व शहाजीराजे यांच्यात उठून दिसतात. आचार-विचारात ते परमधार्मिक होते हे सांगणे नकोच. देवगिरीत श्रीगुरुसेवेत असताना श्री नाथांनी एक पैची चुक शोधून काढण्यासाठी तीन दिवस व तीन रात्री काढल्या. हा व्यावहारिकतेचा सर्वोत्तम आदर्श मानावा लागेल.

श्री जनार्दन स्वामींच्या व्रतनिष्ठ जीवनाची व कर्तृत्वाची छाप परकीय सत्ताधिकाऱ्यांवर निश्चितच पडली असणार त्यामुळेच ते देवगिरीचे दुर्गाधिपती होऊ शकले. श्री नाथांच्या वाटेला परमावधीची गुरुकृपा आलेली होती हे सर्व मान्य आहेच.

आपल्या कुळीची उपासना सोडून कुलधर्माचा त्याग करुन परधर्मीय मलंग पीरांना पूजणाऱ्या हिंदूंची समर्थ रामदास स्वामी आणि तुकाराम महाराजांनी अत्यंत तिखट शब्दांत चांगलीच खरडपट्टी काढली आहे. आपल्या प्रत्येक कुटुंबाला निश्चित अशी एक कुलदेवता असते. पाळण्यासाठी असलेला कुळीचा कुळधर्महीअसतो. परंपरागत कुलाचाराचा विचार करताना असे ध्यानात येते की, आपल्या पूर्वजांपैकी कोणीतरी त्या देवतेला कठोर तपसाधनेने प्रसन्न करुन घेतलेले असते. प्रसन्न झालेली ती देवता त्या उपासकाला असे सांगत असे की, 'तुझ्या वंशावर माझी पूर्ण कृपा राहील. वंशजांपैकी कोणीही माझे स्मरण केल्यास मी तत्काळ धावून येईन. आलेल्या सर्व आपत्तींचे निवारण करीन.' त्यामुळे आपल्या कुळीचा कुलधर्म पाळून प्रार्थना करताच पावणारी देवता ही त्या त्या कुटुंबाची कुलदेवता बनत असते.

नर्मदेच्या दक्षिण भागापासून थेट कावेरीच्या तीरापर्यंतच्या भागात श्रीपांडुरंगाची भक्ति दूरवर पोहोचली आहे. विठ्ठल देव हा कानडा आहे. त्याबद्दल सर्वत्र एकमत आहे. श्री एकनाथ महाराजांचे पणजे भानुदास यांनी थेट कर्नाटकातील विद्यानगरीतून प्रत्यक्ष श्रीपांडुरंगाने नेलेला विग्रह पंढरीस आणला ही कथा सर्वश्रुत आहे. श्री नाथांच्या कुळात विठ्ठल भक्ती ही परंपरेने चालत आलेली आहे. कर्नाटकातील एका सावकाराने श्रीपांडुरंगाचा सर्वांग सुंदर देवता विग्रह पालखीत घालून पैठणला श्रीनाथ महाराजांकडे आणला. त्यांच्या हातचे लोणी खडीसाखर घेण्यासाठी पांडुरंगाने उजवा हात पुढे केला आहे. तो विजयी पांडुरंग पैठणला श्री नाथांच्या देवघरांत गेली चार शतके उभा आहे. श्री नाथांच्या विठ्ठल भक्तीची तो अतूट साक्ष देत आहे. आपली चरित्र नायिका रमा ही नाथांच्या अमृतमय कृपेवर पोसली गेली आहे. पंढरीस तिच्याही घरी येऊन ताकपीठ घेण्यासाठी विठोबाने आपला उजवा हात पुढे केला आहे.

## * ॥ श्री नाथांचे पैठण ॥ *

भारतीय संस्कृती ही नद्यांच्या काठाने वाढली आहे. पवित्र सप्त सिंधूमुळे काही नगरांना श्रेष्ठता प्राप्त झाली आहे. उत्तरेत भागीरथी गंगेच्या काठची हरिद्वार, हस्तिनापूर, ब्रह्मावर्त, प्रयाग, काशी, पाटलीपुत्र, कलकत्ता ही नगरे इतिहास प्रसिद्ध आहेत. यमुनाकाठी इन्द्रप्रस्थ, मथुरा, वृन्दावन ही नगरे ही ऐतिहासिक आहेत. नर्मदा काठची महिष्मती नगरी अशीच प्रसिद्ध आहे. शरयू काठच्या अयोध्येने रघुवंशाचा इतिहास साकारला आहे. गोदा काठची नाशिक व पैठण ही नगरेही प्राचीन आहेत. आपल्या प्रातःस्मरणात सप्त सिंधूंचे स्मरण केले जाते. त्यात पवित्र गोदावरीही येते. गोदावरी गंगा ह्या नावानेही ओळखली जाते. वृद्धगंगा, गौतमी अशी ही तिची नावे आहेत. उत्तरेतील गंगा ही राजा भगीरथाने पृथ्वीवर आणली म्हणून ती भागीरथी ह्या नावाने ओळखली जाते. गोदावरी ही गौतमऋषींनी आणली. ती ऋषीनिर्मित असल्याने तिला वृद्धगंगा म्हटले जाते. काशीची गंगा ही गोदेच्या भेटीस आणली जाते. गोदाजलात ती समर्पित केली जाते. गोदाजल काशीस नेले जात नाही. तशी परंपरा चालत आलेली आहे. ऋषीने गोदावरी आणली असल्याने तिला वेगळी श्रेष्ठता प्राप्त झाली आहे. गोदाकाठी नाशिकच्या पंचवटीत प्रभू श्रीरामचंद्रांचे सीता लक्ष्मणासह एक तप वास्तव्य झाले आहे. दक्षिण भारतात सिंहस्थ कुंभ पर्वणीची स्नाने केवळ गोदावरीत नाशिक त्र्यंबकेश्वरी केली जातात.

गोदावरीने बराच मोठा इतिहास पाहिला आहे. श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वरी ब्रह्मगिरीवर ती उगम पावली. नाशिकवरुन पुढे ती पैठणला येते. प्राचीन अशा प्रतिष्ठान किंवा पैठण ह्या नावाने ह्या नगराचा परिचय देशात सर्वत्र आहे. चक्रवर्ती सम्राट शालिवाहनाची ही राजधानी. शालिवाहन शक हा दक्षिणेतील कालगणनेत गेली १९ शकते मानला जातो. आजच्या भारतीय शासनाने ह्या शककर्त्या

राजपुरुषाचा शक आपल्या कालगणनेत स्वीकारला आहे. एका अर्थी शालिवाहनच्या गौरवाने स्वतःला सुप्रतिष्ठित करून घेतले आहे. हे ऐतिहासिक प्रतिष्ठान नगर 'आपला अडीच तीन सहस्त्रवर्षांचा इतिहास सहज सांगू शकते. पैठणाच्या परिसरात हिंडत असताना ह्या प्राचीन नगराचे भग्नावशेष राहिलेले, इतस्ततः विखुरलेले शीलाखंड आपल्या गत इतिहासाची स्मृति समर्थपणे करुन देतात. गोदाकाठी वसलेल्या ह्या नगराचा दक्षिणोत्तर विस्तारही बराच मोठा होता. ते एक महानगरच होते. उत्तर भारतातून दक्षिणेस जाणारा राजमार्ग ह्या नगरातूनच जात असे. तीर्थाटन करणारे यात्रिक ह्या नगरीत काही काळ थांबून पुढे जात. प्रतिष्ठान हे अत्यंत वैभव संपन्न नगर होते. रेशमी, जरीची वस्त्रप्रावरणे ह्या नगरीत तयार होत असत. व्यावसायिक वणिक मंडळी ह्या नगरात दूरवुरून येत. फार मोठा व्यापार ह्या केंद्रातून चाले. पैठणची भरजरी पैठणी हे स्त्रीयांचे आवडते महावस्त्र त्याचे मोलही बरेच. घरात भरजरी पैठणी असणे हे कुटूंबाच्या ऐश्वर्याचे लक्षण मानले जाई. आजही ही पैठणी वस्त्रप्रावरणांत आपले सर्वोच्च स्थान टिकवून आहे. आपल्या सागरी मर्यादा ओलांडून भारताबाहेर ती चारी खंडात पोहोचली आहे.

गोदाकाठच्या पैठणला जी ऐतिहासिक प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे ती दक्षिण काशी म्हणून. विद्वज्जनांचे ते माहेर घर होते. भारतातील सर्व प्रांतातील विद्वत् श्रेष्ठ ह्या नगरीत आवर्जून येत. वैदिक, याज्ञिक, पुराणिक, कवी येथे वास्तव्य करुन होते. गुरु शिष्य परंपरेने विद्येचे रक्षण केले जात असे. धर्मशास्त्रात निष्णात असलेले शास्त्री पंडित आपल्या विद्वत् सभेत साधक बाधक चर्चा करीत, धर्म निर्णय देत. भारतीय परंपरा तशीच आहे. धर्म सर्वांचे रक्षण करणारा आहे. धर्म कोणावरही अन्याय करीत नाही. धर्माचे परिपालन करणे तसेच धर्मासाठी प्रसंगी प्राणत्याग करणे हा

कर्तव्याचा एक भागच असतो. धर्म निर्णय करण्याचा अधिकार पैठणला प्राप्त झालेला होता. दक्षिणेत पैठण हे सर्व मान्य असे धर्मपीठ होते. श्री ज्ञानेश्वर महाराजांना मिळालेले शुद्धीपत्र पैठणलाच मिळाले होते. काशीची प्रतिष्ठा पैठणलाही होती.

जे राष्ट्र अष्टदिशांनी पूर्ण सुरक्षित आहे. ज्या राष्ट्राजवळ शस्त्रास्त्रांनी पूर्णतः सिद्ध उत्साही अजेय अशी चतुरंग सेना आहे. ते राष्ट्र परकीय आक्रमणांच्या भयापासून सदा सर्वदा मुक्त असते. त्या राष्ट्रातच विद्येची व विज्ञानाची जोपासना होऊ शकते. त्यांचे संवर्धन विकसन होऊ शकते. शालिवाहन, राष्ट्रकुट, अविधेय, देवगिरीचे यादव यांच्या सामर्थ्यशाली खड्ग सिद्ध बाहूबलावरच आपल्या विद्यांचे संवर्धन झाले आहे.

साधूवर्य एकनाथ महाराजांच्या श्रीमत् भागवताच्या एकादश स्कंधावरील प्राकृत टीकेला पैठणात मान्यता मिळाली तरी काशीच्या विद्वत् सभेकडून गौरव प्राप्त झाल्यावरच ती सर्व मान्य झाली. श्री शिवछत्रपतींच्या राज्याभिषेकाला काशीच्या पंडितराज गागाभट्टांना दक्षिणेत यावे लागले ते ह्या साठीच. गागाभट्टांचे घराणे हे मूळचे पैठणचेच. काशी आणि पैठण ही एकाच श्रेणीची विद्वन्मान्य अशी धर्म निर्णयाची स्थाने होती. काशी ही वयाने सन्मानो ज्येष्ठ होती हे मात्र खरे.

भारताची एकात्मता ही आपली राष्ट्रीय भाषा संस्कृतमुळे टिकून राहिली आहे. हे सूर्य प्रकाशा इतके स्पष्ट आहे. संस्कृत ही राष्ट्रीय संपर्काची भाषा होती. त्यामुळे सर्वत्र व सुदूर सुलभतेने संपर्क साधता येई. वेद, उपनिषदे, रामायण, महाभारत, पुराणे आदींचा अभ्यास भारतात सर्वत्र संस्कृत मधूनच होई. धर्म शास्त्राचे अध्ययन संस्कृतातून होई. आजही आपले सर्व संस्कार संस्कृत मधूनच होतात. श्री एकनाथ महाराजांची धाकटी कन्या उमा हिचा विवाह दक्षिणेतील दूरच्या तंजावर प्रांतात एका व्युत्पन्न ब्राह्मण कुटुंबांत

झाला होता. त्यावरुन पैठणचा आप्त संबंधही किती दूरवर पोहोचला होता हे ध्यानात येते.

पैठण क्षेत्री श्री एकनाथ महाराजांच्या हातून घडलेले अति महत्वाचे कार्य म्हणजे शके पंधराशे बारोत्तरी त्यांनी सिद्ध केलेली भावार्थ दीपिकेची शुद्ध पाठावृत्ती होय. 'बहुकाळ पर्वणी गोमटी। भाद्रपद मास कपिलाषष्ठी। प्रतिष्ठानी गोदातटी। लेखन कामाठी संपूर्ण जाली।' असे त्यांनीच लिहून ठेवले आहे. श्री ज्ञानदेवांच्या भावार्थ दीपिकेला ज्ञानेश्वरी संबोधण्याचा परिपाठ श्री नाथांनीच सुरु केला आहे. श्री ज्ञानदेवा नंतर तीनशे वर्षांनी श्री नाथांच्या हातून झालेले हे कार्य ऐतिहासिक तर आहेच. पण संप्रदायाच्या दृष्टीनेही महत्वाचे आहे.

----------



# * ॥ रमेचे माहेर मुंगी ॥ *

पूर्वी सामान्यतः आपले सर्व व्यवहार पंचक्रोशीतीच होत असत. नगरापासून मोठे खेडेवजा गांव कोस दीड कोसावर असे. आजू बाजुस लहान लहान खेडी असत. पांच कोसाच्या म्हणजे दहा मैलांच्या आत मोठे गाव वसलेले असे. एका गावाच्या शिवारास लागून दुसऱ्या गांवचे शिवार असे. गावागावातील हद्दी निश्चित केलेल्या असत. त्या हद्दीवर एखादा विशाल वृक्ष असतो. संरक्षक देवतेचे लहानसे देऊळही तेथे दिसे.

आपला देश हा कृषी प्रधान आहे. कृषी हेच उपजीवनाचे महत्वाचे साधन असल्याने त्या शास्त्राची उत्तम जाणकारी सामान्य माणसानांही असे. ऋतु परत्वे होणारी वेगवेगळी पिके हे त्या त्या क्षेत्राचे वैशिष्ट्य असे. वातावरणाला अनुकूल अशी फळझाडे ही विपुल संख्येने लावली जात. गोसंवर्धन प्रत्येक कुटूंबात होई. सामान्यातल्या सामान्य माणसाकडेही १०-२० पशु सहज असत. प्रत्येक गाव हे स्वयंपूर्ण असे. बारा बलुतेदार समक्षतेने गावची सर्व कामे करीत. रोख रकमेऐवजी धान्याच्या परिमाणात सर्व व्यवहार होत. तसा व्यवहार सर्वांना सोयीचा वाटत असे. एकमेकांशी सुसंवाद राखण्याचा प्रयत्न समाजातील सर्व थरातून होई. श्रीज्ञानदेवांच्या सांगण्याप्रमाणे 'देणे घेणे सुखाचिये वरी' होत असे. गावात एखादे मंदिर असावयाचे. त्याच्या उभारणीत सर्व समाजाचा हातभार लागे. सेवा भावाने मंदिराची सर्व कामे होत. देवालयाच्या व्यवस्थेसाठी जमिनी इनाम दिलेल्या असत. त्या उत्पन्नातून देवाची पूजा-अर्चा-उत्सव-यात्रा आदि सर्व कार्यभार पार पडे. मंदिरात कथा, कीर्तने, पुराण, प्रवचन होत. त्यांच्या श्रवणानें सारा समाज बहुश्रुत होत असे. धर्मपरिपालनासाठी सर्वजण तत्पर असत.

पैठण पासून साधारण दोन अडीच कोसावर म्हणजे ४/५ मैलांवर गोदावरीच्या पैलतीरावर मुंगी हे गाव वसलेले आहे. हे गाव

पैठण इतकेच प्राचीन आहे. ऐतिहासिक प्रतिष्ठानचाच मुंगी एक भाग असावा. ह्या गावाचे जुने नाव पिप्पिलिका होते असा उल्लेख सापडतो. त्याच बरोबर वैदुर्यपट्टण ह्या नावाने हे गाव ओळखले जात असे. वैदुर्यरत्नांचा व्यापार ह्या गावातून होत असे. राक्षस भुवनाच्या लढाईनंतर मुंगीला पेशवे निजामाचा संधी झाला. निजामाने आपले हत्ती मुंगीला येऊन विकले असे सांगितले जाते.

गोदावरी ही पैठणला नागघाटा पर्यंत दक्षिण वाहिनी आहे. पुढे पूर्व वाहिनी होते. पैलतीरावरच्या मुंगीलाही ती प्रथम दक्षिण वाहिनी असून पुढे महादेवाच्या प्राचीन मंदिरापासून ती पूर्व वाहिनी होते. मुंगीजवळ गोदावरीस चार प्रशस्त घाट बांधलेले होते. आता गोदेचा प्रवाह बदलला असल्याने ते नदी काठच्या मातीत अदृष्य झाले आहेत. पूर्वी थोडी दूर असलेली गोदा आता प्रवाह बदलून गावाजवळ आली आहे. श्री शिवछत्रपतींच्या भोसले घराण्याची श्री शहाजी राजांच्या आधीची एक शाखा मुंगीत स्थायिक झाली आहे. त्यांची तेथे बरीच घरेही आहेत. ह्या घराण्याची गुरुपरंपरा आपली चरित्र नायिका रमा हिच्या पितृकुलाकडे नाईक घराण्याकडे आहे.

मुंगीचा अध्यात्मिक इतिहास ही स्मरणीय आहे. येथे अरुण नावाच्या एका भक्ताला भगवान गोपालकृष्णाचे दर्शन झाले आहे. प्रत्यक्ष श्रीकृष्ण भक्ताच्या भेटीसाठी तेथे आले होते असे भाविक जन सांगतात. भागवत संप्रदायातील वैष्णवांचे महान आचार्य श्री निंबार्क यांचे मुंगी हे जन्मस्थान आहे. आपल्या तपःसामर्थ्याने रात्रीच्या अंधारात कडुलिंबाच्या वृक्षावर प्रकाशमान चक्र टाकुन साधु भोजनासाठी त्यांनी सूर्यप्रकाश निर्माण केल्याचे सांगितले जाते. त्या प्रसंगाची जागृत स्मृती ठेवून आज ही मुंगी गावात कडुलिंबाचे झाड तोडले जात नाही आणि त्याचे लाकूड जाळले जात नाही. श्री निंबार्काचार्यांचा मठ मुंगीला आहे. श्रीकृष्णदयार्णवांनी श्रीमत् भागवताच्या दर्शन स्कंदावर हरिवरदा ह्या नावाचा ४२०००

ओव्यांचा जो प्रचंड ग्रंथ लिहिला तो मुंगीस पूर्ण केला. श्रीकृष्ण दयार्णवाचा सनातन कृष्णदयार्णव मठ मुंगीस आहे. तेथे श्रीविठ्ठल राही रुक्मिणी यांच्या बरोबरच श्रीगोपालकृष्णांचा सुंदर देवता विग्रह विराजित आहे. तेथे एक स्फटिक शिवलिंगही आहे. ह्या मठाची व्यवस्था चरित्र नायिका रमा हिच्या माहेरच्या नाईक वंशाकडेच आहे.

नाईक घराणे हे मुंगीस स्थिर होऊन बरीच शतके लोटली असावीत. मुंगीचे कुलकर्णी वतन या घराण्याकडे वंश परंपरागत चालत आलेले आहे. नाईक घराण्याची गेल्या दहा पिढ्यांची वंशवेल तेथेच वास्तव्य करून असलेल्या श्री वसंतराव नाईक यांचेकडून उपलब्ध झाली आहे. यजुर्वेदांतर्गत आद्य कण्व शाखेचे हे घराणे आहे. त्यांचे गोत्र अत्री आहे. उपजीवनासाठी या घराण्याकडे कुलकर्णी वतन असले तरी हरिभक्तीचा वसा हा पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेला आहे. पैठणच्या श्रीनाथांच्या घराण्याची भानुदासांच्या कालापासून या घराण्याचे ऋणानुबंध आहेत. ह्या घराण्यात गेल्या पिढीत वै. ह. भ. प. रंगनाथ बुवा नाईक हे विद्वान प्रवचनकार व कीर्तनकार होऊन गेले. त्यांचा शिष्य परिवार ही बराच मोठा आहे. मुंगीतली श्री विठ्ठल रुक्मिणी व गोपालकृष्ण मंदिरातील पुजा अर्चादि समाधानकारक नाईक मंडळीच वंशपरंपरेने करीत आहेत.

---------

# ॥ अवतरण ॥

भारत ही भगवंताची लीलाभुमी आहे. परमेश्वर मनुष्यदेह धारण करून येथे जन्म घेत असतो. भगवान श्रीकृष्णांना पूर्णावतार मानले जाते. ते युगावताराही आहेत. युगावतार हे ते जन्मलेल्या युगात सर्वश्रेष्ठ पुरुष असतातच; परंतु नंतर येणाऱ्या युगासाठी अनुकरणीय असा वस्तुपाठ ते आखुन ठेवीत असतात. दानवी प्रवृत्तीच्या कालरात्री युगावतार होण्याची प्रसाद चिन्हे दिसू लागतात. ईश्वरावतार व्हावा म्हणून त्याआधी ऋषीजन तप साधना करु लागतात. श्रीकृष्णांच्या अवतारासंबंधात हरिवंश, महाभारत व श्रीमत् भागवत यात विस्ताराने लिहिले आहे. श्रीमत् भागवताच्या दशम व एकादश स्कंदात श्रीभगवतांच्या चरित्र गाथेचे वेगळेपण लगेच लक्षात येते. भावदावतार सहसा एकट्याने अवतरत नाही. त्याच्या कार्यास सहाय्यभुत होणारे त्याचे लीला सहचरही त्याच्या समवेत आगे मागे जन्म घेत असतात. भगवत् कार्यातील आपापला कार्यभार पुरा करीत असतात.

कंसाच्या असुरी राज्याच्या सीमेतच यमुनाकाठी व्रजभूमीत श्रीकृष्ण भावानांनी केलेली लीला हा एक लोक विलक्षण प्रयोग आहे. व्रजात हे बालकृष्ण आहेत. नंदलाल आहेत, यशोदा नंदन आहेत. त्यांच्या त्या ईश्वरी बाल जीवनात पुतना, शटकासूर, कालीया, देवराज इंद्र एका मागून एक विघ्ने आणतात. भय निर्माण करतात; पण श्रीकृष्ण लीला सहचर मात्र पूर्ण निर्भय आहेत. श्रीकृष्ण बालस्वरूपात असले तरी त्यांचे कित्येक सहचर वयाने मोठे आहेत. ते उत्कटतेने आपल्या कन्हैय्यावर प्रेम करतात. पण त्यांचे प्रेम जगावेगळे आहे. ते निर्हेतुक आहे, प्रेमासाठी प्रेम आहे. व्यवहारी जगात आम्ही ज्याला प्रेम म्हणतो ते प्रेम केवळ स्वतःच्या स्वार्थजन्य सुखासाठीच असते. व्रजवासी त्यांच्या श्रीकृष्णावर प्रेम करतात ते स्वसुखासाठी नाही तर त्यांचा प्रेमास्पद सुखी व्हावा

म्हणून. आम्ही काय केले म्हणजे आमचा कन्हैया सुखी होईल ? याचा ते अखंड विचार करतात. त्याने आपल्या करंगळीवर गोवर्धन उचलला तर आपल्यासाठी त्याला कष्ट नकोत म्हणुन ते गोवर्धनाला लगेच काठ्यांचा आधार देतात. आपल्या प्रेमस्पदावर असुरी संकट येताच त्याच्याभोवती आपल्या छातीचा परिकोट करून तो आघात स्वतःवर झेलायला लगेच सिद्ध होतात. श्री तुकाराम महाराजांचे पाईकीचे अभंग वाचताना मनाला एक विचार स्पर्श करून गेला की, श्रीकृष्ण भगवानाच्या प्रत्यक्ष उपस्थितीत त्यावेळी आसुरी आघात छातीवर झेलण्याची त्यांची वासना अपुरी राहिल्याने ते व्रजगोप स्वराज्य साधनेसाठी प्राणार्पण करणारे मावळे म्हणून तर श्री शिवाजी महाराजांबरोबर जन्मले नसावेत ?

भगवान श्रीकृष्णांचे जीवनचरित्र हे मुख्यतः त्यांच्यानंतर येणाऱ्या युगातील लोकांना भक्तीमार्गाचा आदर्शपाठ देण्यासाठी आहे. देव भक्तीचे साम्राज्य निर्माण करण्यासाठी आहे. अनेकविध अंगांनी केली जाणारी भक्ती व त्यातून अनुभवास येणारी भगवद् प्राप्ती ही अनुभवसिद्ध आहे. हे भगवद् भक्त खुशाल 'नलगे मुक्ती धनसंपदा ।' म्हणून 'सुखे घालावे जन्मासी ।' असे मागणे मागतात. तसेच 'संत संग देई सदा ।।' असाही आग्रह धरतात. त्यांना मृत्युभय स्पर्श करू शकत नाही. पुनर्जन्माची सुद्धा ते अपेक्षा करीत असतात. पुढचा जन्म कसा असावा हे ही ते सांगून टाकतात. 'पंढरीचा वास । चंद्रभागे स्नान । आणिक दर्शन विठ्ठलाचे । हेचि मज घडो जन्मजन्मांतरी । मागणे श्रीहरी नाही तुजे ।।' असे संत शिरोमणी नामदेवराय स्पष्टच सांगतात.

भक्तीसाम्राज्याची अधीश्वरी भगवती राधा ही आहे. ती श्रीकृष्ण परमात्म्याची ह्लदिनी शक्ती आहे. भक्तीच्या क्षेत्रात तिचे स्थान एकमेव द्वितीय सर्वश्रेष्ठ आहे. राधा श्रीकृष्णाची आराधिका आहे. तिच्या कृपेशिवाय तिचे नित्य नामस्मरण केल्याविना

श्रीकृष्ण कृपा होणे सर्वस्वी अशक्य आहे. राधा हा श्रीकृष्ण प्राप्तीचा महामंत्र आहे. भगवती राधा ही तिच्या समवयस्क अष्टसख्यांची नायिका असून श्रीकृष्णापेक्षा ती एक वर्ष पंधरा दिवसांनी धाकटी आहे. भाद्रपद शु. ।। अष्टमी ही श्री राधेची जन्मतिथी मानली जाते. ललिता, विशाखा, चित्रा, चंपकलता, रंगदेवी, सुदेवी, भद्रा व तुङ्गविद्या ह्या राधेच्या अष्ट सख्या आहेत. श्रीकृष्ण लीला सहचरी भगवती राधा ही अखंड प्रभु सहवासात असल्याने ती व्रज सोडून सहसा बाहेर जात नाही; परंतु तिच्या अंतरंग सख्या मात्र कारणपरत्वे मानवी देह धारण करून इहलोकी अवतरत असतात. भक्त जनांना त्या प्रभुच्या नित्य अस्तित्वाची प्रचिती देत असतात. त्यांच्यापैकी एखादी सखी नामयाची दासी जनी बनून प्रत्यक्ष भगवंताला जात्यावर दळायला लावते तर दुसरी तुकारामांची जिजाऊ बनून त्याच्या सुकोमल ओठांना उकळत्या दुधाचे भांडे लाऊन स्मरणात राहील अशा चटका देऊन त्याला आपली मान वाकडी करायला लावते. पायात रुतलेला काटाही त्याच्या हाताने काढून घेते. तिसरी कर्माबाई बनून देवाला भल्या पहाटे गरम खिचडी खायला लावते. देवांच्या चिरंतन अस्तित्वाची खुण भक्तांच्या हृदयावर अंकीत करण्याचे काम ह्या सख्या मधूनमधून करत असतात. अशा चिन्हामुळे भगवत् प्राप्तीच्या मार्गाचे यात्रिक आपल्या मार्गाबद्दल निःशंक होतात. सामान्य श्रद्धाळू माणसे भक्तीमार्गाने जाण्याचे निश्चित करतात. वस्तुतः श्रद्धा ही स्वानुभवावर अधिष्ठीत असते आणि ती अनंत जन्मांच्या परिपाकाची फलश्रुती असते. श्रद्धावान हा निष्कलंक चारित्र्याचा, निष्कपट मनाचा, अपार सत्यनिष्ठ आणि परम कारुणीक असतो. त्यामुळेच तो जनसामान्यांचा विश्वासपात्र मार्गदर्शक ठरतो.

पाचशे वर्षांपूर्वी वंग भूमीत अवतरलेले सुप्रसिद्ध प्रेमावतार श्रीकृष्ण चैतन्य गौरांग महाप्रभु यांचे ज्येष्ठ बंधू विश्वरुप हे

विठ्ठलभक्त आहेत. बालपणीच वैराग्य प्राप्त झाल्याने त्यांनी गृहत्याग केला होता. जीवनाच्या अखेरीस ते पंढरपूरला आले होते. पंढरीसच त्यांनी आपली जीवनलीला संपविली. श्री महाप्रभुंनी आपल्या वैष्णव भक्तांच्या समवेत भारत भ्रमण करून तीर्थयात्रा केली होती. भगवती श्रीमती राधेची अंतरंग सखी श्री तुङ्गविद्या ही श्रीचैतन्य संप्रदायाची आराध्य देवता आहे. तिनेही मानवी शरीर धारण करून नामसंकीर्तन करीत महाप्रभुंबरोबर तीर्थयात्रा केली होती असे सांगितले जाते. स्वयं भगवान श्रीकृष्णानेच महाप्रभुंच्या रूपाने मनुष्य शरीर धारण करून श्री राधेची भगवत विरह व्यथा जीवनभर अनुभवली होती. तर सखी तुङ्गविद्येने पुरुष शरीर धारण करून महाप्रभुसह भगवंताची सख्य भक्ती कशी असे हे दाखवून दिले होते. श्रीमती राधेच्या अष्टसखीपैकी अथवा सहचरी गोपीपैकी कोणी कोणी क्वचीत स्त्रीशरीर असूनही पुरुष वेष धारण करून वृंदावनात सखा भावनेने जीवनभर साधना करीत असतात. जन्मतः स्त्री शरीर असुन पुरुष वेशाने सखा भावाने वृंदावनांत साधना करीत असलेल्या एका थोर विभूतीचे दर्शन घेण्याचे सौभाग्य मला लाभले आहे.

श्री विठ्ठलभक्तीच्या अनुवंशिक उपासनेने परमशुचिता प्राप्त झालेल्या मुंगीच्या श्री. गोविंद नाईक व त्यांच्या सहधर्मचारिणीने केलेल्या भगवद् भक्तीचे फलित देऊन कन्येच्या रूपाने त्यांच्या घरी जन्म घेऊन रमेने ते कुल धन्य केले आहे. अष्टसखींपैकी श्रीतुङ्गविद्या हिला जन्म देऊन रमेच्या मातेने आपल्या वात्सल्य मातृत्वाला अजरामर करून ठेवले आहे. प्रयत्न करूनही ह्या प्रातः स्मरणीय मातृदेवतेचे नाव मला समजू शकले नाही. रमेची जन्मतिथी आणि शक शोधूनही मिळाली नाही याचे अतिशय वाईट वाटते.

चारशे वर्षांपूर्वी रमेने जन्म घेऊन धन्य केलेल्या मुंगी येथील नाईक यांच्या वास्तुचा आज विचार करीत असता तिला घर

म्हणण्यापेक्षा वेऊळच म्हणावे लागेल. आज ती वास्तु श्री सनातन महाराज मठ या नावाने ओळखली जाते. पूर्वी ऋषींच्या निवासस्थानाला आश्रम म्हटले जाई. आज आश्रमांची घरे झाली आहेत. गोविंद नाईकाचे वास्तव्य स्थान हे देवघर असल्याने तेथील सारे व्यवहार देवासाठीच चालत होते. तेथे पहाटे विठ्ठलाची काकडा आरती होई. देवासाठी करावयाचे सारे व्यवहार स्वतः शुचिर्भूत होऊन करावे लागतात. देव जागा आहे या भावनेने करावे लागतात. प्रातस्मरण हे स्वतःला आपल्या स्मरणीय इतिहासाचे व तीर्थरूप भारताचे स्मरण करून देण्यासाठी असते. पहाटे देवळात गायल्या जाणाऱ्या भूपाळ्या या अनिद्रा असलेल्या देवाला जागे करण्यासाठी नसतात तर आम्ही जागे होऊन तुमच्या दारी आलोत ह्या जाणीवेतून गायिलेल्या असतात. तन्मय होऊन देवासाठी केले जाणारे सारे उपचार हे त्याच्याशी सख्यत्व साधले जावे म्हणून केले जातात.

रमेच्या जन्माच्याआधी पासून नाईकांच्या देवघरात श्री विठ्ठलासाठी केले जाणारे सारे उपचार त्या देवसखीच्या अवतरणासाठीच होते असे म्हणावे लागते. व्रजभूमीत मी राधेच्या तान्हेपणाची एक मनोहर कथा ऐकली आहे. दैवी सौंदर्य घेऊन ही देवता तेथे अवतरली खरी परंतु जन्मापासून तिने डोळेच उघडले नव्हते. प्रयत्न करूनही ती डोळे उघडेना, काही पाहेना. आपली कन्या जन्मांध आहे ह्या जाणीवेने राधाजननीला परमावधीचे दुःख झाले. त्या परिसरात तिच्या या दुःखामुळे उदास खिन्नतेची छाया पसरली. यशोदेच्या कानावर ती ही वार्ता गेली. तिलाही फार वाईट वाटले. राधेला पहाण्यासाठी ती बाळकृष्णाला कडेवर घेऊन राधेच्या घरी गेले. राधेच्या त्या अवस्थेमुळे असलेली उदास खिन्नता तेथे सर्वत्र पाहुन यशोदाही दुःखी झाली. राधा पहुडली होती. त्या पाळण्यापाशी ती गेली. डाव्या कडेवर बाळकृष्ण होता. डावा हात त्याच्या शरीराचा तोल सावरीत होता. पाळण्यापाशी जाऊन किंचीत

वाकून तिने राधेच्या मुखमंडलावरून हात फिरवला आणि दाटलेल्या कंठाने यशोदा म्हणाली, 'बाळ ! किती सुंदर आहेस गं !' जरा डोळे उघड ना ! त्याचवेळी कडेवरच्या बाळकृष्णाने आपल्या चिमुकल्या डाव्या हाताने त्या पाळण्याची दोरी पकडली. तो पाळणा जोराने हालवू लागला आणि सहजतेने बोबड्या बोलाने उद्गारला 'राधा' ! पाळणा हलू लागताच आणि प्रभूची ती मधुर हाक ऐकताच राधेने क्षणात डोळे उघडले आणि ती हसू लागली. पृथ्वीवर अवतरण झाल्यावर मी डोळ्याने प्रथम पाहिल ते माझ्या प्रभूलाच ! अन्य कोणालाही पहाणार नाही. तो येईपर्यंत डोळे उघडणारच नाही असा निश्चय करूनच राधा अवतरली होती. तिने प्रभूची हाक ऐकताच डोळे उघडले. प्रसन्न हास्य केले आणि आनंदाने सारे वातावरण भरुन टाकले.

श्रीराधासखी तुङ्गविद्या ही देवतेचे सौंदर्य घेऊन नाईकांच्या घरी अवतरली होती. जन्मापासूनचे सारे संस्कार तिच्यावरती केले जात होते. सूर्यदर्शन, देवतादर्शन यथासमय झाले. गोविंद नाईकांनी कन्या जन्माची सुवार्ता पैठणास श्री एकनाथ महाराजांना कळविली. त्यांनाही त्या वार्तेने आनंद झाला. श्रीनाथांच्या दर्शनास कन्येला घेऊन गोविंद नाईक पती पत्नी पैठणला गेले. त्यांच्या चरणावर तिला घालीत असतानाच त्यांनी तिला अलगद आपल्या मांडीवर घेतले. स्मित हास्य करणाऱ्या त्या स्वरूपसुंदर बालिकेच्या प्रसन्न मुखमंडलावर हात फिरवून श्रीनाथांनी तिला 'रमा' म्हणून हाक मारली. लगेच तिने संमतीदर्शक हुंकारही दिला. श्रीनाथांनी तिला आपल्या देवघरातील विजयी पांडुरंगाचे दर्शन घडविले. तिचे अन्नप्राशन विजयी पांडुरंगाच्या प्रसादस्वरूप लोणीसाखरेने झाले.

हळूहळू रमा वाढू लागली. नाईकांच्या देवघरात होणारे सारे उपचार ती वडिलांजवळ बसून पाहू लागली. प्रसन्नतेने आपल्या लहानशा हातानी होणाऱ्या उपचारांचे अनुकरणही करू लागली.

तिच्या बाल लीलांमुळे मुंगी - पैठणांत जणू वृंदावन अवतरल्याचे सर्वांना भासू लागले. बाल्यावस्थेत श्री नाथांच्या दिंडीबरोबर तिला पंढरीस जाण्याचाही योग आला. देवळात श्री विठ्ठलाच्या दर्शनास पित्याच्या कडेवर बसून गेल्यावर रमा श्री विठ्ठल चरणांकडे झेपावली. आपल्या सुकोमल हातांनी ते समचरण घट्ट धरून त्यावर आपले मस्तक ती घासू लागली. एक टक विठ्ठलाकडे ती पहात असताना भावमग्न झाल्याने बरोबरीच्या सर्वांना जाणवले. पंढरीहुन माघारी परत येताना तिच्या डोळ्यात सारखे अश्रु दाटत होते. ती सारखी वळून मागे पहात होती. तिची ती अवस्था पाहिल्यावर श्रीनाथ गोविंद नाईकांना म्हणाले, 'गोविंदबुवा ! पंढरी हे रमेचे सासर आहे. आपण इथेच तिला द्यायला हवे !'

----------

# * ॥ पंढरीचे महाजन बडवे ॥ *

भूवैकुंठ पंढरपूराबद्दल बरेच लिहिले गेले आहे. इतिहासाचे अभ्यासक, विद्वतजन आणि भक्त मंडळी यांनी वेळोवेळी त्यावर लिहिले आहे. विशेष खोलात न शिरता अडीच सहस्त्र वर्षांपूर्वी झालेल्या भगवान श्री विष्णुस्वामींनी व त्याच कालातील श्रीमत् आद्यशंकराचार्यांनी पंढरीक्षेत्री येऊन श्री पांडुरंगाचे दर्शन घेतलेल्याचा उल्लेख इतिहासात सापडतो. तेथे श्री विठ्ठल विटेवर एकटाच उभा आहे. तर त्याची छाया स्वरूप सहधर्मचारिणी रुक्मिणी मागे उभी आहे. पंढरीच्या बडवे मंडळींचे व विठोबाचे ऋणानुबंध हे खूप जुने आहेत. हा पंढरीचा देव जसा कानडा आहे तसेच बडवे मंडळीही मूलतः कानडीच आहेत. यजुर्वेदातील आदित्य परंपरेच्या आद्य कण्व शाखेतील ही ब्राह्मण मंडळी कात्यायन सूत्रातील आहेत. ही मंडळी त्रिप्रवरान्वित काश्यप गोत्री आहेत. ह्या घराण्याच्या मूळ पुरुषाचा शोध लागणे शक्य झाले नसले तरी शामराज, तिम्मन, मल्हार व तानबा ह्या चार बडवे बंधूचा कुटूंब विस्तार म्हणजे आजची बडवे मंडळी आहेत.

शामराज बडवे यांच्या वंशात आपली चरित्र नायिका रमा हिचा विवाह झाला आहे. त्यांची वंशावळ मला उपलब्ध झाली नाही. आपल्या पूर्वजांना कुटूंबाचा इतिहास, आपली वंशावळ, इत्यादी लिहून ठेवण्याची रीत नव्हती असे प्रायः सांगितले जाते. आपले रामायण, महाभारत आणि पुराणे यात कितीतरी वंशावळी दिसतात. मग मध्यंतरातच ही पद्धती का थांबली असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचा दोष त्यांच्या निष्क्रीयतेचा नाही असे माझे मत आहे. भारतावर शतशतवर्षे जे विध्वंसक इस्लामी राज्य होते त्याच्या परिणामामुळे हे घडले आहे. विध्वंसनाच्या भयानक आपत्तीत आपण कसे बसे जिवंत रहायला हवे ही त्याकाळी हिंदू समाजाची मुख्य धडपड होती. घरे दारे लुटून फस्त होत होती. जाळून भस्म होत होती. अशा आपत्तीत

लिखित ग्रंथ संपत्ती कागदपत्रे सुरक्षित ठेवणे अशक्य होते. इतिहास असे सांगतो की, अलेक्झांड्रिया येथील प्रचंड ग्रंथालय जाळण्याची आज्ञा खलिफा उमर याने दिली. त्या परिसरातील सहस्रावधी सार्वजनिक स्नानगृहांना पाणी तापविण्यासाठी ते ग्रंथ उपयोगात आणले गेले. त्यांना सहा महिन्यांवर ते इंधन पुरले. अशीच प्रचंड जाळपोळ भारतात सर्वत्र झालेली आहे.

विजयानगरच्या हिंदूसाम्राज्यातील राजकुलात श्री विठ्ठलाची उपासना परंपरेने चालत होती असे दिसते. कर्नाटकात सामान्यजन ही विठ्ठल भक्त आहेत. आज कर्नाटक राज्याची जी भौगोलिक चतुःसीमा अस्तित्वात आहे; त्यापेक्षा ऐतिहासिक कर्नाटक अधिक विस्तृत होता. सामान्यतः कृष्णानदीच्या दक्षिणेकडील भागाला कर्नाटक मानले जात असे. पंढरपूरला कर्नाटक तसा जवळचाच भाग आहे. विजापूरच्या आदिलशाहीच्या अंतर्गत पंढरपूर मंगळवेढा हा प्रदेश होता. पंढरपूरचे ऐतिहासिक ऋणानुबंध कर्नाटकाशी खूप निकटचे होते. महत्वाच्या तीर्थक्षेत्रातून पूर्वीचे राजमार्ग जात असत. रमेचे पती नामदेव आण्णा यांचे काशीहून लिहिलेले माघ शु. ।। २ शके १५३० चे म्हणजे इ. स. १६०९ मधील पत्र पंढरपूरच्या होळकर दप्तरात उपलब्ध आहे. ते पत्र एका कर्नाटकातील चिदंबर शास्त्रींबरोबर त्यांनी आपले पुत्र दादा यास लिहिले असून ते शास्त्री पंढरपूर मार्गे कर्नाटकात जात असल्याचा उल्लेख त्या पत्रात आहे.

पंढरीस देवदर्शनास येणारी यात्रिक मंडळी सामान्यतः बडवे मंडळीच्या घरीच थांबत असत. परंपरेने बडवे कुलातील सत्पुरुषांकडून ते मंत्रानुगृहही घेत. मंत्रानुग्रहाची ही परंपरा अनुवंशिकतेने चालत असे. पंढरीस येताना पांडुरंगास समर्पण करावयाच्या मौल्यवान वस्तु भक्तजन आणीत. आपल्या ह्या गुरुजनांच्या योग क्षेमासाठी त्यांच्या शेतीत उत्पन्न होणारी धान्ये, कडधान्ये, गुळ आदि वस्तूही आणीत. उंची वस्त्रेही आणीत. दानाचे

पुण्य मिळवीत. देवाला आणि भूदेवांना चांगल्या वस्तू उत्तमोत्तम वस्त्रप्रावरणे अलंकार आदि दान दिल्याने आपल्या घरांत सर्वप्रकारची समृद्धी वाढते असा ह्या श्रद्धाळू यात्रिकांचा अनुभव असे. त्यांचे अंतरिक संबंध अत्यंत जिव्हाळ्याचे असत. यात्रिक त्यांचा निरोप घेत त्यावेळी त्यांची अंतःकरणे जड होत. डोळे पाणावत. पुनः लवकर येण्याच्या विचाराने ते स्वस्थानी प्रस्थान ठेवीत. त्यांची देवता विठोबा ही भक्तांच्या प्रेमाचे मूर्तिमंत स्वरूप असल्याने भक्तांच्या ह्रदयातून ही अखंड प्रेमाचे पाझर वहात असत. पंढरीच्या भूवैकुंठात नामाच्या गजरात आनंद भजन कीर्तनात आनंद. एकमेकांच्या पायी लागण्याचा आनंद. कडकडून भेटताना आनंद. सारे भेदाभेद भ्रम विसरुन आत्मसुखाचा मिळणारा हा आनंद सर्वांना उत्कटतेने अनुभवास येत असे. आनंदाच्या डोही आनंदाच्या तरंगात सारेच डुंबून जात.

विठ्ठल भक्तांशी कोणतेही व्यवहार करताना बडवे मंडळी अत्यंत प्रामाणिकपणाने, सचोटीने करीत. सारेच विश्वासाने वागत. अनुभवाने हा विश्वास दृढ होत असे. शामराज बडवे यांच्या कुलातील अनेकविधी गुणविशेषांमुळे त्या परिवाराला लोक महाजन असे संबोधू लागले. महाजन ही वेगळी उपाधी तशी चार पाचशे वर्षांइतकी जुनी आहे. आदिलशाहीतून येणारी भक्त मंडळी प्रामुख्याने त्यांना महाजन संबोधित. इतरांतून पृथकत्व असलेले हे महाजनपण शामराज बडवे यांच्या कुलाने अनुवंशिकतेने सांभाळले आहे. आजही हा परिवार महाजन बडवे म्हणूनच ओळखला जातो.

भल्या पहाटे पांडुरंगाच्या गर्भागाराचे द्वार उघडल्यावर 'हरिःॐ उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते देवयन्तस्त्वेमहे' हे ब्रह्मणस्पते सूक्त खड्या आवाजात म्हणून महाजन बडवे देवाला उठण्याचे आवाहन करीत. त्यानंतर देवाचे प्रातःकालचे उपचार सुरु होतात. रात्रीची शेजारती झाल्यावर द्वारे बंद झाल्यावर ते विश्रांतीसाठी घरी जात असत.

बाल विवाहाची पद्धत भारतात केव्हा सुरु झाली याचा शोध घेणे कठीण आहे. स्वयंवर करणाऱ्या क्षत्रिय राजकन्या ह्या जाणत्या झालेल्या असत असे. आपल्या प्राचीन इतिहास ग्रंथावरुन दिसते. ब्राह्मण कन्यांच्या विवाहासंबंधात स्वयंवर पद्धती रुढ होती असे दिसत नाही. वेदांच्या भिन्नभिन्न शाखा, गोत्र प्रवरे, कुलपरंपरा यांचा विचार ब्राह्मण कन्यांच्या विवाहासंबंधात होत असे. वेद रक्षण त्याच बरोबर यज्ञ यागादि परंपरांचे रक्षण ब्राह्मणांना करावे लागे. विद्यादानाचे, संस्कृती रक्षणाचे महत्वाचे कार्य ब्राह्मणांनी सांभाळले होते. ब्राह्मणाचे तपस्वी जीवन हे मूलतः त्यागावर अधिष्ठित आहे. जितका त्याग मोठा तितकी ती व्यक्ती श्रेष्ठ असे मानले जाई. अपरिग्रह वृत्ती ब्राह्मणांनी अनुवंशिकतेने जोपासली होती. त्रेतायुगापासून चातुर्वण्य मानले जात असावे असे दिसते. तपस्वी ब्राह्मणांच्या आश्रमांची वर्णने आपल्या प्राचीन ग्रंथात वाचावयास मिळतात. परकीय प्रवाशांच्या लेखनातूनही ते दिसून येते. 'ब्राह्मण्य रक्षावे आदरे' असे समर्थ रामदासांनी लिहिले आहे.

अनुवंशिकतेने सावधानतेने आपला वर्ण धर्म सांभाळला पाहिजे ही आपली सामाजिक दृष्टी पाचीन काळापासून आजपावेतो सांभळली जात आहे. विवाह हा एक पवित्र संस्कार आहे. गृहस्थाश्रमात पदार्पण करण्यासाठी हा संस्कार आहे. सुप्रजा जननासाठी हा संस्कार आहे. ही जाणीव सर्व समाजाला असे. 'सर्वांचे मूळ हे गृहस्थाश्रम!' असे समर्थ रामदासांनी आवर्जून सांगितले. बहुतांशी सारे ऋषीमुनी गृहस्थी असत. सर्वसंग परित्यागी असलेल्या श्रीरामकृष्ण परमहंसांनीही विवाह संस्काराशिवाय मनुष्य परिपूर्ण होऊ शकत नाही म्हणून आपण विवाह केल्याचे सांगितले आहे.

विठ्ठल भक्तीचा अनुवंशिक वसा घेतलेल्या कुलात रमेचा जन्म झालेला आहे. विठ्ठल भक्त श्री एकनाथ महाराजांची कृपा तिच्या

पितृकुलावर आणि स्वतःवरही झालेली आहे. तिच्या मानवी जीवनाचे विकसन पूर्णपणाने होऊन ती देवतास्वरूप व्हावी ह्या उदात्त हेतूने रमेचा विवाह निश्चित केलेला वाटतो. श्रीनाथ महाराजांनी ह्या विवाहासंबंधात विशेष रस घेतलेला असावा असे मानायला खूप जागा आहे.

शामराज बडवे यांच्या महाजन कुलातील नामदेव आण्णा यांच्या बरोबर रमेचा विवाह बालपणीच पंढरपूरला झाला असे सांगितले जाते. श्रीनाथ महाराजांच्या उपस्थितीत त्याच्या मंगलमय शुभाशीर्वादाने हे कार्य पार पडले. रमा विवाह संस्काराच्या वेळी केवळ पाच वर्षांची होती तर तिचे पती नामदेव आण्णा दहा वर्षांचे होते. रमेचे एक नाव भागीरथी असावे असे ऐकण्यात आले आहे. रमा हेच नाव सर्वत्र रूढ आहे.

----------

# * ॥ ताकपीठे विठोबा ॥ *

नामदेव आण्णांची सहधर्मचारिणी ह्या नात्याने रमेने पंढरीस महाजन बडव्यांच्या घरी केलेल्या पदन्यास हा तेथील भक्तीच्या वातावरणाला एक आगळे वळण लावायला कारण ठरला. ज्ञानदेव, नामदेव आणि एकनाथांनी ह्या क्षेत्रात आधीच रूजलेल्या भक्तीच्या रोपाला विशाल वृक्षाचे स्वरूप प्राप्त करून दिले होते. ज्ञानदेवांची ज्ञानोत्तर भक्ती आद्य शंकराचार्यांच्या परंपरेचे मनोज्ञ दर्शन घडविणारी होती. नामदेवांचे देवाचे सख्य त्यांच्या समर्पित जीवनाच्या भक्तीभावाने ओथंबलेले होते. एकनाथांच्या जीवनाला भक्तीचा प्रवाह हा हरिद्वार पासून प्रयाग पर्यंत जाणाऱ्या गंगेच्या शुद्ध धवल प्रवाहासारखा होता. रमा ही व्रजविहारिणी असल्याने यमुना काठचे गोपीचे बाल कन्हैय्यावर असलेले अंतरीचे प्रेम घेऊन चंद्रभागेच्या तीरावर आली होती.

वाढत्या वयाबरोबर रमेचे अंतरंग प्रफुल्लीत होऊन विकसित होत होते. भल्या पहाटे जागी होत असताना आपल्या कानी दुरून कोठून तरी मुरलीचे मधुर स्वर ऐकू येतात असे तिला जाणवत असे. त्या स्वरांच्या नादातच अंतरंगात तिचा गोपी भाव जागृत होई. शरीर घरातल्या कामाला लागे. हंबरणाऱ्या गाईच्या पाठीवर प्रेमाने थाप मारुन गो दोहन करताना ती मधुर गीत गाई. आपल्या प्राणसख्यासाठी आपण दूध काढत आहे. दधिमंथन करताना त्याला सकाळीच ताजे लोणी द्यायचे आहे ह्या जाणिवेने तिचे हात काम करीत. पहाटे चंद्रभागेवर स्नानाला गेल्यावर व्रजातले यमुनेचे विशाल पात्रच तेथे वहात असल्याचे तिला जाणवे. पहाटे देवळातील काकड आरतीच्या वेळी आपला कन्हैया हा नटवर असल्याचे जाणून त्याच्या कटीवर हात असलेल्या वेगळ्या रूपाकडे पाहून ती कधी भावगंभीर होई. छाया म्हणून मागे उभ्या राहिलेल्या रुक्मिणीकडे पाहून ती काही वेळा पुटपुटायची व्रजात तर तू

नव्हतीस. तेथे तो राधारणीच्या आधीन होता. तूं द्वारकाधीशाची महाराणी! व्रजात होती आमची राधाराणी आम्ही तिच्या सख्या.

रमेचे मधून मधून होणारे हे भावांतर नामदेव आण्णांच्याही ध्यानात आले होते. पण त्यांनी ते तिला जाणून दिले नाही. गृहिणी ह्या नात्याने घरात होणारे तिचे व्यवहार व्यवस्थित पार पडत त्यामुळे ते निश्चिंत होत. त्यांचे वेदाध्ययन सुरु होते. देवतार्चनही नीट पार पडे. त्यासाठी सर्व तयारी रमा करून देत असे. घरी अतिथी अभ्यागत येत. गृहस्थी धर्मानुसार त्यांचे सारे काही केले जाई. त्यात थोडाही उणेपणा येत नसे. कधी कधी आपल्या देवतार्चन नंतर आणि रात्री झोपेसाठी अंथरूणावर पडल्यावर नामदेव आण्णा रमेबद्दल बराच विचार करीत. रमा रूप गुण संपन्न होती. पण तिचे हे सुंदर स्वरूप ह्या लोकीचे नाही. ती कोणीतरी देवताच स्वर्गातून पृथ्वीवर अवतरली असावी. विठोबाशी ह्या देवतेचे खूप जवळचे नाते असावे. त्याच्याच ओढीने ती पंढरीस आली असणार. हे त्यांना सारखे वाटे. ह्या लोकीची नसलेली ही देवता पत्नी म्हणून आपल्या सारख्या यःकश्चित मनुष्याला लाभली. ह्याचे त्यांना दुःखही होई. काही वेळा ह्या दुःखाचे कढ अनावर होऊन त्याचे अश्रूत रूपांतर होई. आपले अश्रु कोणालाही दिसणार नाहीत याची नामदेव आण्णा काळजी घेत.

एका पहाटे का विठ्ठल मंदिरातील काकड आरती नंतर देवाची पंचामृत पूजा सुरु झाली. रमा नामदेव आण्णांच्या मागेच उभी होती. तिच्या हाती लोण्याचा गोळा होता. तिच्या ओठांची किंचितही हालचाल न होता मध्ययेतून ती देवाला आळवीत होती. 'घे रे! तुझ्यासाठीच हे ताजं लोणी आणलय्. तू ते खायला हंवस. व्रजात तुला हातान लोणी भरवता येत होतं. तुझ्या सावळ्या गालाला लोणी फासून तुझं विलोभनीय सौंदर्य पहाता येत होते. तूं व्रजाला विरहात टाकून इथं दूर आलास. मी तुला कशी विसरेन कान्हा. गोपी तुला

कशी विसरेल रे ? चल चटकन तोंड उघड अन् हे खा !! नाहीतर बघ मी आहे अन् तू !' नामदेव आण्णांच्या ते लगेच ध्यानात आले. विठ्ठलाकडे आपले आरक्त असलेले डोळे एकटक लाऊन रमा भाव धुंद होऊन विठ्ठलाशी अंतरंगातून संवाद करते आहे. तिचा मुखमंडलावर दैवी आभा प्रकाशते आहे. तिने लोण्याचा गोळा घेतलेला आपला हात पुढे केला आहे. क्षणांत त्यांनी विठ्ठलाकडे पाहिल्यावर ते चमकले. रमेच्या हातातील लोण्याचा गोळा विठ्ठलाच्या मुखात होता आणि त्याचे दोन्ही गाल लोण्याने माखले होते. हे महाद्दाश्चर्य पाहून त्यांनी पुनः रमेकडे आपली मान वळविली. तर तेथे रमेच्या स्वरूपात साक्षात् रूपसुंदर व्रजविहारिणी श्रीकृष्णसखी अवतरली होती. आण्णांनी स्वतःला कसे तरी सावरले. थोड्याच वेळात रमा पूर्णपणे भानावर आली.

रमा रुक्मिणीचे दर्शन घेऊन घरी परतली. नामदेव आण्णा काही वेळाने घरी येत. माध्यान्ही भोजन होत असल्याने रमा उशीरा पाक सिद्धीस लागे. घरच्या देवांची पूजा नैवेद्य, वैश्वदेवानंतर अतिथीची प्रतिक्षा करून आण्णा भोजनास बसत. त्यांच्या भोजनानंतर रमेचे होई. घरचा नित्यक्रम ठरलेला असे. त्यात सणावारी थोडासा बदल घडे.

घरातील सोप्यावर बसून रमा आण्णांची वाट पाहू लागली. ठरलेल्या वेळी ते घरी परतले नाहीत. रमा सचिंत झाली. माध्यान्ह काल झाला आण्णा आले नाहीत. सायंकाल झाली. रात्रही संपली. आण्णा घरी परतले नव्हते. दुसरा दिवस व रात्रही तशीच गेली. तिसराही दिवस गेला आण्णा आले नाहीत. ह्या तीन दिवसांत रमेने चूल पेटविली नाही. स्वतः अन्नग्रहण केले नाही. पाण्याचा थेंबही तिने घेतला नाही. देहाचे उपचार म्हणून ती स्नान करीत होती. देवापुढचा दीप उजाळित होती. तिने गो दोहन केले नाही आणि दधिमंथनही केले नाही. देवळांतही गेली नाही. सोप्यावरच्या

भिंतीला डोके टेकून ती तीन दिवस तीन रात्र तशीच बसून होती. तिच्या श्वासात केवळ श्रीकृष्णाचे नामस्मरण होते.

श्रीकृष्णाच्या नामस्मरणात चौथा दिवस सुरु झाला. रमा पूर्णतः भावमग्न होती. ती देह भावावर नव्हतीच. रात्रंदिन एक मात्र चिंतन होते तिच्या हृदयेश्वराचे ! डोळे मिटून भिंतीला डोके टेकवून ती सोप्यावरच बसून होती. तिच्या कानात शब्द उच्चारला गेला. 'राधे!' कदाचित तो भ्रम असेल. दुसरे कोणी तरी बोलले असेल. 'राधे ! राधे !!' डोळे उघड मी आलोय् !' शब्द पूर्व परिचित असल्याने रमेने डोळे उघडून त्याला पाहिले अन् रुसून पुनः डोळे बंद करून घेतले. कानावर पुनः शब्द पडला 'राधे ! खरंच मीच आहे गं ! रूसलीस तूं ?' रमा भानावर लगेच उद्गारली, 'आता कशाला आलास ? मला त्रास द्यायला ?' 'नाही गं मला खूप भूक लागलीय् !' तिच्या कानावर स्पष्ट शब्दोच्चार आला आणि तिने पाहिले बाल स्वरूपात तोच पुढे उभा आहे. त्याचे मुखमंडल कोमेजून गेले आहे. तिने त्याला ओळखले. 'तुला अन् भूक ? खोटारडा कुठचा' रमा तळमळून बोलू लागली. 'चार दिवस मी काही खाल्लेलं नाही. पाणीही प्यायले नाही. चूल सुद्धा पेटविली नाही. घरचा अतिथी पूजक स्वामी घरी नाही. मी त्याची सारखी वाट बघतेय. तू इथं कशाला आलास ?' 'मला खूप खूप भूक लागलीय म्हणून आलोय गं ! काही तरी खायला दे ना !' अगदी रडू आल्यागत चेहरा उतरवून बालमूर्ति म्हणाली, 'तुला खायला घालायला घरं कमी आहेत कां ? इथं कशाला कडमडलास ?' रमेने विचारले 'घरं खूप आहेत गं पण मनापासून तुझ्याशिवाय मला कोण खायला घालणार ?' त्याने विचारले. 'माझ्याकडे काय आहे ?' रमेने विचारले आणि पुढे म्हणाली, 'चार दिवसाचे शिळं ताक आहे. त्यातलं लोणी तर तूच खाल्लस.' 'चालेल मला ते !' बालमूर्ति म्हणाली, 'त्यात लाह्याचे पीठ कालवून दे. लवकर दे. खूप खूप भूक लागलीय् !' रमा लगबगीने

घरात गेली. चार दिवसाच्या शिळ्या ताकांत तिने लाह्याचे पीठ कालवले. पिठाची वगडी त्याच्या पुढे ठेवली. 'तुला उपाशी रहावं लागलं नं ! खा आता हे पीठ' रमा व्याकुळतेने म्हणाली, 'तू उपाशी राहून कसं चालेल. लवकर कां नाही आलास माझ्याकडे ?'

तिच्या बोलण्याकडे लक्ष न देता तो वगडीत दिलेले ताकपीठ प्रसन्नतेने खात होता. 'आणखी हवं कां ?' रमेने विचारले. 'अं हं !' म्हणून त्याने नकारार्थी मान डोलावली. तोच नामदेव आण्णा दारात येऊन उभे राहिले. बालस्वरूप रमेच्या हातचे ताकपीठ खाताना त्यांनी पाहिले. क्षणार्धात ते स्वरुप अंतर्धान पावले. वेगाने घरात येऊन रमेजवळ बसून आण्णा दाटल्या कंठाने म्हणाले, 'रमे ! मी ते पाहिलय !' 'काय ?' रमेने दीर्घश्वास सोडून विचारले. 'आतांच घडले ते !' डोळ्यातील अश्रु पुशीत आण्णा म्हणाले, 'आपल्या साठीच त्याला इथं यावं लागलं. चार दिवस त्याला उपास पडले. म्हणून तो आला' रमा म्हणाली. 'नाही रमे ! तुझ्यासाठीच तो आपल्या घरी आला. मी तुला ओळखलय् तू ह्या लोकीची नाहीस !' आण्णा म्हणाले. 'तसं नाही हो' रमा म्हणाली, 'मी तुमची बायको रमाच आहे रमा ! एवढे म्हणून पाकसिद्धीसाठी रमा घरात गेली. मनातून खूप ओशाळल्याने नामदेव आण्णा पुढे काही बोलले नाहीत. जणू काही घडलेच नाही ह्या भूमिकेतून रमेचे व्यवहार पूर्ववत सुरु झाले.

मध्यरात्री आपल्या शैय्येवर उठून बसून जवळच निजलेल्या रमेला संबोधून आण्णा म्हणाले, 'रमे !' 'हं ! काय ?' लगेच उठून रमेने विचारले. 'झोप लागली होती ?' त्यांनी विचारले. 'नाही, जागीच होते.' रमा उत्तरली, 'तीन दिवस मी घरी नव्हतो.' आण्णा.... 'ते मला माहीत आहे'.... रमा... 'कुठे गेलो होतो हे विचारलं नाहीस ?' त्यांचा प्रश्न. 'नाही विचारलं ! आपण माझे पतीदेव आहात.' तिचे उत्तर 'म्हणून तर विचारायला हवं होतस ?' आण्णा म्हणाले. 'आपल्याला ज्ञानोबांच्या वडिलांप्रमाणे संन्यास

घ्यायचा होता नं ?' रमेने हे विचारून पुढे म्हटले, 'आपल्या वैराग्याची मला पुरेपुर जाणीव आहे. पण मी असेपर्यंत तो मार्ग आपल्यासाठी नाही.' 'होय रमे ! मला खरोखरच संन्यास घ्यायचा होता.'आण्णा सांगू लागले. 'पण माऊलींच्या वडिलांप्रमाणे माझी अवस्था नाही. ते माऊलींचे तीर्थरुप होते. मी तसा नाही. त्यांना परमज्ञान प्राप्तीसाठी संन्यास घ्यावासा वाटला. माझं तसं नाही रमे ! मी अगदी सामान्य माणूस आहे गं ! 'मग काय झालं ?' रमेने विचारले. कंठ दाटून येऊन आण्णा सांगू लागले, 'माझ्या संन्यासाचे कारण वेगळे आहे. रमे ! मी तुला ओळखलय. तू या लोकीची नाहीस. तू देवता आहेस. कृष्णाची सखी आहेस. तुझा पती म्हणवून घेण्याची माझी पात्रता नाही. मी सामान्य माणूस आणि तू देवता ही नाती मला संन्यास घ्यायला प्रवृत्त करतात. काय करावे मला समजत नाही. त्यामुळे मी देवळातूनच गेलो होतो. माझ वागणं शास्त्रविरुद्ध होतं हे मनाला टोचतं होतं. म्हणून मी माघारी परतलो. घरी आलो तर विठोबा तुझ्या हातचं ताकपीठ खाताना मी पाहिलय्. काय करावे समजत नाही. 'तूच सांग !' मंद स्मित करून रमा म्हणाली, 'अहो ! आपल्यामुळे तर तो इथे आला. आपल्याला त्याचे दर्शन दिले. घरचं ताकपीठ खाल्ले. वाडवडिलांची पुण्याई थोर. तुमची विठोबाची भक्तीच फळाला आली. आता मनातलं सारं काढून टाका. आपण गृहस्थी आहोत. नाथ महाराज गृहस्थीच होते. त्यांच्या घरीही पांडुरंग गेला होता. पण ते संन्यासी झाले नाहीत. आपण नाथांच्या परंपरेतले आहोत. पंढरीच्या भागवत धर्माचा वसा वंश परंपरेने चालावयाचा असतो. तो खंडीत करून कसं चालेल ? आपला वंश पुढे चालवायला हवा. विठोबाची वंशपरंपरेने सेवा करणं हा महाजन बडव्यांचा धर्म आहे. आपला धर्म सोडून कसं चालेल ? वंश वाढू द्या. मला अहेवपणे हा लोक सोडून जाऊ द्या. मग फार तुम्ही संन्यास घ्या. मी नाही म्हणणार नाही.'

नामदेव आण्णांच्या मनात निर्माण झालेले वादळ रमेच्या बोलण्याने पूर्ण शांत झाले. रमेच्या सांगण्याचा आशय त्यांच्या ध्यानी आला. रात्री त्यांना शांत झोपही लागली. नित्याप्रमाणे ब्रह्ममुहूर्ती ते जागे झाले. प्रातःस्मरण करीत ते सोप्यावर आले. ज्या जागी रमेने श्री विठ्ठलाला ताकपीठ खायला दिले होते. त्या ठिकाणी त्याची मूर्ति प्रगट झाली असल्याचे त्यांनी पाहिले. तो आपल्याकडे पाहून मंद हास्य करीत असल्याचे त्यांना जाणवले.

----------

# * ॥ धन्य तो गृहस्थाश्रम ॥ *

ताकपीठ खाण्याच्या निमित्ताने श्री विठोबा महाजन बडव्यांच्या घरी प्रगटला. रमेने त्याला आपल्या घरी यायला भाग पाडले. ही शुभ वार्ता आसमंतात सर्वत्र पोहोचावयास वेळ लागली नाही. विठ्ठलाच्या भक्तांची रीघ दर्शनासाठी त्या घरी येऊ लागली. सर्वांना ताकपीठाचा प्रसाद मिळू लागला. आपल्या घरी प्रगटलेल्या श्रीविठोबाचे सारे उपचार मुख्य देवळातल्या देवाप्रमाणेच महाजनांच्याकडे होऊ लागले. ह्या विठ्ठलाला सर्वजण 'ताकपीठे विठोबा' संबोधू लागले.

श्री विठ्ठलाच्या कृपेने लवकरच रमेला पुत्र लाभ झाला. ताकपीठे विठोबा पुढे ठेवून आपला सुपुत्राचा नामकरण संस्कार नामदेव आण्णांनी केला. दादा ह्या नावाने त्याला संबोधू लागले. श्रीनाथ महाराज पंढरीस आले असताना दादाला त्यांच्या चरणावर घालून त्यांचे कृपाशिर्वादही प्राप्त झाले.

दूरदुरुन भक्त मंडळी पंढरीस विठ्ठल दर्शनासाठी अखंड येतात. आलेले सारे यात्रिक आवर्जून ताकपीठे विठोबाच्या दर्शनास येत. लाह्या पिठाच्या प्रसादात आपलाही सहभाग हवा म्हणून यात्रिक भरपूर ज्वारी व गुळही महाजनांकडे आणुन देत. देवाच्या सेवेसाठी वस्त्रे अलंकार समर्पित करीत.

लहानपणीच मौजी बंधन होऊन दादाचे वेदाध्ययन सुरु झाले. नामदेव आण्णांचे अनुकरण करून तो देवपूजाही करू लागला. वयाच्या दहाव्या वर्षीच नामदेव आण्णांप्रमाणेच दादाचा विवाह संस्कार झाला. सुन जवळच्या प्रांतातलीच होती. रमेने सुनेला राधा म्हणून हाक मारायला सुरुवात केली. आपल्या लहानशा सुनेच्या जीवनाला वात्सल्यपूर्ण भावाने अत्यंत प्रेमाने योग्य ते वळण रमा देऊ लागली. राधा ही रमेचे सारे अनुकरण करु लागली. नामदेव

आण्णा व रमा, दादा व राधा यांचा गृहस्थाश्रम सर्वांना एक आदर्श पाठच बनून राहिला.

कर्नाटकातून उत्तरेत त्रिस्थळी यात्रेला जाणारा एक मोठा जथा पंढरीस दर्शनास आला होता. त्यातील बरेच यात्रिक नामदेव आण्णांच्या परिचयाचे होते. त्या यात्रिकांबरोबर आपणही काशी यात्रेस जावे. त्रिस्थळी यात्रा करावी. पितरांची श्राद्धे करावीत. पितृऋण फेडावे असे नामदेव आण्णांना वाटले. रमा, दादा जवळ त्यांनी तो विचार बोलून दाखविला. यात्रेला चांगली सोबत मिळते आहे हे पाहून त्यांनाही आण्णांचा यात्रेचा विचार आवडला. यात्रिकांसह नामदेव आण्णा काशी यात्रेला गेले.

नामदेव आण्णांनी काशीहून माघ शु ।। २ शके १५३० (इ. स. १६०९) ला त्यांचे चिरंजीव दादा यांना लिहिलेले मोडी लिपीतील पत्र पंढरपूरच्या होळकर वाड्यातील ऐतिहासिक संग्रहात उपलब्ध आहे. ते पत्र वाचनीय असल्याने समग्र देत आहोत.

।। श्री विठ्ठलाय नमः ।।

चिरंजीव दादा याजला श्री क्षेत्र काशी वरोन नामदेव आण्णा महाजन याजकडोन शुभ मंगल आशीष.

आपणापासोन निघाले पासोन तीर्थयात्रेकरी समवेत. इथे स्थानी क्षेम पूर्वक आलो. अन्न पाणी बद्दल भिन्नता झालेने व्याधी प्राप्त झाली. समागमे लोक चांगले असलेने त्यांनी उत्तम प्रकारे प्रकृतीची उठाठेव करोन ध्यान दिले. इथले उपाध्याय वे. मू. कृष्णंभटशास्त्री महाराज याजकडे तळ देवून आहोत. जागा विस्ताराने मोठी सौरक्षित असोन शीतल वायोपासून उपद्रव नाही. विशाल गंगामातेचा किनारा वृक्षवेलीचे वन प्रसन्न मन नीरव स्थळ कारणे मन जप जाप ध्यान

धारणाकडे धावते. तत्राप मन आवरोन आहोत. स्नुषा सौ. राधाची खेळकर बालमूर्ति चक्षुसमोर येवोन संन्यस्त वृत्ती समाप्त होते. तिजला ताकपिठ्या विठ्ठलाची सेवा करण्यास आज्ञा केली होती. त्यानुसार घडले पाहिजे. इथली भव्य उत्तुंग देवळे देखिल्यावर मनीची मनी आवड की तुम्हाकडोन श्री ताकपिठ्या विठ्ठलाचे देऊळ निर्माण व्हावयास पाहिजे हा क्षेत्री संकल्प असे. अन्य स्थळे देखोन श्री विश्वेश्वराची पूजा उपचार धर्मविधी यथोपचित पार करोन श्रींचा मोठा उत्सव महाशिवरात्री नंतर भीड ओसरल्यावर परतीचा मानस आहे. मारगी समागमे यात्रेकरी थवा आहेच. श्री ताकपिठ्या विठ्ठलाच्या दर्शनाची उत्कंठा लागली आहे. वज्रचुडे मंडित सौभाग्यवती चिरंजीव राधास आशीर्वाद. तुमच्या सौभाग्यवती मातोश्रीस आशीर्वाद. हा सांगावा घेवोन शास्त्री महाराजांचे शिष्य वे. पू. चिदंबर शास्त्री याजबरोबर पाठविला असे. ते कानडी भागात जात असलेने वाटेत क्षेत्र पंढरीस वास्तव्य करोन पुढे जातील. त्यांची वास्तापुस्त यथायोग्य सांभाळावी.

इत्यालम् माघ सुदी वीज शक १५३०'

हे पत्र इतके बोलके आहे की त्यावर वेगळे भाष्य करण्याची आवश्यकताच नाही.

---------

# * ॥ नामदेव आण्णा काशीहून परतले ॥ *

पंढरपूरला आलेले कोणीही यात्रिक ताकपिठ्या विठोबाचे दर्शन घेतल्याशिवाय आपली यात्रा पूर्ण झाली असे मानीत नाहीत. नियमाने दर्शनास येणारे भाविकही ताकपिठ्यास आवर्जून येत. जिच्या उत्कट भक्तीमुळे देव ताकपीठ खाण्यासाठी तिच्या घरी आला त्या भक्तीमती रमेचेही दर्शन त्यामुळे आपोआपच होत असे. महाजन बडव्यांचे जे जुने घर आता देऊळच बनले होते. विठोबाच्या मुख्य देवळातले सारे उपचार आता तेथे ही होत. दारावर कोणी अतिथी अथवा यात्रिक आला तर आपल्या गृहस्थीधर्माप्रमाणे त्याचे स्वागत करायचे अशी रीत भारतात सर्वत्र पाळली जाते. तीर्थक्षेत्री तर ती विशेषत्वाने पाळली जाते. तीर्थ-क्षेत्री येणारा कोणीही तेथे असलेल्या पवित्र नदीत स्नान करून शुद्ध होण्यासाठी येतो. पावन करणाऱ्या देवता दर्शनासाठी येतो. तीर्थस्नानाने पंचभौतिक शरीराची शुद्धी तर होतेच पण अंतर्मनाची शुद्धीही होते. देवता दर्शनाने देवतेशी सख्य साधले जाते. भवतापाने होणारे सारे क्लेश दूर होतात. मन परमसुखाने आनंदाने भरून जाते. ऐहिक सुख दुःखाच्या पलिकडे असलेल्या आनंदाच्या डोही ते यथेच्छ डुंबू लागते. भक्त काम कल्प द्रुम असा प्रभु प्रत्यक्ष भक्ताच्या आर्त भक्तीमुळे त्याच्या घरी येत असतो. त्याची सर्व मनोकामना पूर्ण करीत असतो. त्याची कृपा प्राप्त झालेले वितरागी साधु महात्मे अतिथी रूपाने भिक्षा मागण्यासाठी घरी येऊन मूठ भर भिक्षा घेऊन ओंजळी भरभरुन सुखाचा भगवत प्रसाद देत असतात. आत्मानुभूति देत असतात. असा आपला सर्वत्र येणारा अनुभव आहे. इतिहास त्याला साक्षी आहे. अतिथीला देव मानावे अशी आपल्या धर्माचीही शिकवण आहे. महाजन बडव्यांच्या घरात अतिथी पूजेचे व्रत कटाक्षाने पाळले जाई.

सूर्यास्तापूर्वी अडीच तीन घटका यात्रिकांचा एक लहानसा जथा महाजन बडव्यांच्या दारी थांबला. आलेले पथिक सामान्यतः दाराबाहेर उभे राहून 'पांडुरंगं ! पांडुरंगा !!' असा नामोच्चार मोठ्याने करीत. आत सोप्यावर असलेल्या कोणास तरी त्याची जाणीव होई. घरातून लगेच बाहेर येऊन त्याच्या झोळीत भिक्षा घालून त्याला नमस्कार केला जाईल. त्या दिवशी आलेल्या अतिथीने संबोधनार्थी मोठ्याने 'पांडुरंगा ! पांडुरंगा !!' असा नामोच्चार केला. आत सोप्यावर राधाच काहीतरी काम करीत होती. तिच्या कानात ते भगवन्नाम शिरले. ती क्षणात चमकली. लगबगीने तशीच बाहेरच्या दारापाशी आली. तिच्या कर्णसंपुटात शिरलेला तो नामघोष अंतःकरणाला स्पर्श पावला. गत स्मृति जागृत झाली. बाहेर उभ्या असलेल्या यात्रिकाकडे तिने क्षणमात्र पाहिले. यात्रिकाच्या डोळ्यातून प्रेम पाझरत होते. मुखमंडलावर मधुर स्मित चमकत होते. डोक्यावरचा पदर सारखा करीत खाली मान घालून आनंदा तिरिकाने ती उद्गारली, 'मामंजी ! आपण !!' अतिथीने संमती दर्शक हुंकार देऊन मान डोलावली. 'जरा थांबा ! भाकरतुकडा घेऊन येते' असे सांगून लगेच राधा माघारी वळली. सोप्यावरूनच आतल्या माजघरांत असलेल्या रमेला उद्देशून आनंदातिरेकाने ती म्हणाली, 'सासुबाई ! बाहेर कोण आलय् बघा ! मामंजी !!' राधाने लगबगीने स्वयंपाक घरात जाऊन भाकरीचा तुकडा आणून नामदेव आण्णांवरून तो ओवाळून टाकला. त्यांच्या पायावर पाणी घातले. उंबऱ्यावरून त्यांनी घरात प्रवेश केला. हातपाय धुतले, सोप्यावर अंथरलेल्या कांबळ्यावर ते विसावले. त्यांच्या बरोबर आलेले यात्रिकही हातपाय धुवून त्यांच्या शेजारीच बसले.

माजघरातूनच नासिकाग्री दृष्टी असलेल्या रमेने दृष्टीवर करून नामदेव आण्णांना घरात शिरत असताना पाहिले. गुडघ्यांच्या खाली थोड्याशा पोटऱ्या झाकणारा नेसलेला पंचा.

अंगात घातलेली बाराबंदी. डाव्या खांद्यावरची पडशी. उजव्या हातातली कानापर्यंत पोहोचणारी काठी. डोक्याला गुंढाळलेला लहानसा रुमाल, प्रवासाने शिणलेले शरीर, तेजस्वी मुखमंडल, वाढलेली दाढी, कपाळावरील गंध, नाममुद्रा सारेच परिचित होते. त्यांना पाहून रमा तशीच आतल्या घरात गेली.

राधेने सर्वांना वाकून नमस्कार केला. तिच्या पाठीवरुन प्रेमभराने हात फिरवून 'अखंड सौभाग्यवती भव ! पुत्रवती भव !!' असा आशिर्वाद देऊन आण्णा बरोबरच्या अतिर्थींना म्हणाले, 'ही आमची सुनबाई राधा ! यात्रेला गेलो तेव्हा चिमुरडी लहान होती. आता मोठी झालीय.' साऱ्यांच्या चेहऱ्यावर प्रसन्नतेचे हास्य चमकले. तेवढ्यात नासिकाग्री दृष्टी असलेली रमा ही बाहेर आली. तिच्या एका हातात ताकपीठ असलेल्या वाट्यांनी भरलेले ताट होते. दुसऱ्या हाती पाण्याने भरलेला तांब्या होता. तो आण्णांपुढे ठेवून तिने वाकून सर्वांना नमस्कार केला. 'सौभाग्यवती भव !' असा आशीर्वाद सर्वांनीच दिला. लागोलाग सारे अतिथी उठून उभे राहिले. देवाशी सख्यत्व साधलेल्या त्या भगवत लीला सहचरीला त्यांनीही वाकून नमस्कार केला. 'दादाची आई !' दाटलेल्या कंठाने नामदेव आण्णा रमेकडून पाहून म्हणाले, 'किती वाळलात ! प्रकृती बरी आहे ना ? तिचे कुशल विचारताना आण्णांचा दाटलेला कंठ, डोळ्यातून पाझरणारे अश्रु पाहून रमेची अवस्थाही त्याहून वेगळी नव्हती. आपल्या पदराने तिने डोळे पुसले. 'विठोबा सर्वांना सांभाळणारा, त्यानेच आपल्यास सुखरूप पंढरीस आणले, तीन वर्षे झालीत काशी यात्रेला जाऊन. येणारे यात्रेकरू काशीकडच्या विपरीत गोष्टी सांगत. काळीज कापले जायचे. विठोबाला सतत सांगायची सर्वांना सुखरूप घरी आण. दादा ! राधा खूप खंतावलेत. सारख्या आठवणी काढतात' रमा म्हणाली.

नामदेव आण्णा काशी यात्रेहून घरी आल्याची वार्ता गल्लीत लगेच सर्वांना समजली. अवघ्या पंढरीत ती वाऱ्याच्या गतीने पसरली. त्यांच्या घराकडे दर्शनासाठी लोकांची रीघ लागली. दादा देवळात होते. तेथेही ही शुभवार्ता पोहोचायला वेळ लागला नाही. लगबगीने ते बरोबरच्या मंडळींना घेऊन घरी आले. सोप्यावर विसावलेल्या तीर्थरूपांना पाहून ते मोठ्याने म्हणाले, 'आण्णा !' आणि त्यांनी पितृचरण घट्ट धरले. दादाच्या पाठीवरून हात फिरवीत 'चिरंजीव भव ! आयुष्यमान भव !!' असा आशीर्वाद देत त्यांचे नेत्र पुत्र भेटीचे आनंदाश्रु ढाळू लागले.

यथासमय नामदेव आण्णांनी मुख्य देवळातील व आपल्या घरातील श्री विठ्ठल रुक्मिणीस काशीहून आणलेल्या गंगाजलाने स्नान घालून रमेसह महापूजा केल्या. यात्रेचे मावंदे केले साऱ्या पंढरीस प्रसाद भोजन दिले.

---------

# ✻ ॥ राधा सखीचे वृंदावन गमन ॥ ✻

रंगपंचमीच्या रात्री आकाशात नुकताच चंद्रोदय झाला होता. उन्हाळा जाणवू लागल्याने घरातील बहुतेक मंडळी धाब्यावरच निजत असत. रमेच्या शेजारीच राधाही निजत असे. पहाटे लवकरच उठावे लागत असल्याने रात्री सर्वजण सामान्यतः लवकरच निद्राधीन होत. 'राधे झोप लागली गं ?' रमेने हळूच विचारले. 'नाही सासुबाई !' राधा उत्तरली आणि अंथरूणावर उठून बसली. निरभ्र आकाशात चमचमणाऱ्या चांदण्याचा प्रकाश चंद्रोदयामुळे किंचीत मंद झाला होता. चंद्र प्रकाशामुळे आकाश उजळून निघत होते. 'वृंदावनात होळीचा उत्सव खूप मोठा होता' रमा सांगू लागली. 'तिथले सारे गोप गोपी होळीच्या दिवसात खूप रंग खेळतात. सगळीकडे खूप उत्साहाने तो खेळ होतो. नेहमी वाटत आपण व्रजात जावं तिथला स्वर्गीय आनंद खूप लुटावा.' 'आपण सारेच जाऊ या वृंदावनाला' राधा म्हणाली. 'आपल्या तोंडून तिकडच्या गोष्टी ऐकत असताना सारखं वाटतं आपणही जावं एकदा.' ते कसं शक्य आहे ? राधे ! रमा म्हणाली, 'विठोबाला सोडून कुठं जाणार. इथचं आपलं वृंदावन आहे गं ! विठोबा सारं सोडून आपल्या घरी आलाय. इथंच सारं काही आहे.' सासूबाई उद्या नाथ षष्ठी आहे. 'नाथांच्या बद्दल काही सांगा नं !' राधेने रमेची स्मृती जागवली. 'उद्याची षष्ठी मोठी पवित्र आहे बघ !' रमा सांगू लागली. जनार्दन स्वामींचा जन्म, त्यांना झालेले दत्त दर्शन, नाथांचे दत्तदर्शन, स्वामींची पुण्यतिथी सारं ह्याच षष्ठीला झालं !' नाथही ह्याच तिथीला वैकुंठी गेले, 'राधा बोलून गेली. त्यावर रमा बोलली.' होय नं ! ते गुरुशिष्य अगदी एकरूप झाले होते. भक्तांनी पुन्हा पुन्हा पैठणाला येण्याचा त्रास घेऊ नये म्हणून नाथांनीही तोच योग साधला. पैठणला तसं खुपदा जाणं झालय. नाथांचं घर आपलं माहेर आहे. त्यांच्याच कृपेवर पोसलेली आपण माणसं आहोत. कार्तिकीला नाथ इथं आले होते. ते माघारी परत जाताना आम्ही शिवेपर्यंत

पोहोचवायला गेलो होतो. तुझ्या सासऱ्यांना हाक मारून त्यांच्या पाठीवर प्रेमाने हात फिरवून नाथ म्हणाले, 'जावई ! नेमाप्रमाणं पैठणला या हं ! रमेला पण घेऊन या.' मग माझ्याकडे वळून म्हणाले, 'पोरी ! आमच्यापेक्षाही तू विठोबाला जवळची. त्याला भेटायला आम्हाला दुरुन यावं लागतं. त्याला तू रोज भेटतेस. भाग्यवान आहेस. सासर माहेर एक केलेस. येताना प्रसाद घेऊन ये ! रमा उत्कटतेने सांगत होती. तेरा वर्षांपूर्वीचा तो प्रसंग जणू आताच घडतोय ह्या जाणीवेने ती बोलत होती.

'राधे ! अगं ते माझ्या डोळ्या देखत घडलय् गं !' दाटलेल्या कंठाने डोळ्यातून पाझरणारे अश्रु पदराने पुसून रमा आपले हृदय मोकळे करीत होती. 'नाथ मी प्रत्यक्ष पाहिलेत. त्यांच्या देवघरातला तो विजयी पांडुरंग !' त्यांच्या हातचं लोणी खडीसाखर घेण्यासाठी उजवा हात पुढे करून उभा आहे. नाथ त्या हातावर लोणी साखर द्यायचे. एकदा नाथ पंढरीला आले असताना त्यांना आवडते म्हणून मी दगडीत कालवून त्यांना ताक पीठ दिले होते. ते खाताना नाथ म्हणाले, 'तुझ्या हातचं ताकपीठ विठोबाला कां आवडतं ते आता समजले. आम्हीही पैठणला जन्माष्टमीला ताकपीठाचाच नैवेद्य प्रसाद देत जाऊ.' वृंदावनातल्या गोपी सुद्धा कृष्णाला ताकपीठच खाऊ घालत असतील. त्या तशा गरीबच. त्या त्याला कुठली पक्वान्न खायला देणार ? गौळणीच त्या घरी दूध ताक लोणी भरपूर. त्यालाही तेच आवडत असणार. द्वारकेचा राजा झाल्यावर ही सुदाम्याचे मूठभर पोहे नाही का खाल्ले ? खरं तर तू वृंदावनची गोपीस आहेस. 'महाजनांच्या घरात भाग्यलक्ष्मी म्हणून आलीस.' नाथांचा एकेक शब्द मला अजून आठवतोय. राधा सासुला एकेक शब्द कर्ण संपुटांत साठवित होती. पुढे रमा म्हणाली, 'मी तुला राधा म्हणून हाक मारते. राधा ! राधा !! म्हणून हाक मारल्यावर कृष्ण धावत येतो. राधे ! महाजनांच्या ह्या घरात तू सोन्याच्या पाऊलांनी आली. तुला पहिल्यांदा पाहिली तेव्हाच मी तुला राधा म्हणायचं

ठरवलं. राधा हा कृष्णाला जवळ बोलवायचा मंत्र आहे. राधेशिवाय कृष्ण कुठेच असणार नाही. माझ्यानंतर विठोबाचे सारे उपचार तूं करत जा. त्याला रोज ताकपीठ देत जा. न दिलेस तर तो उपाशी राहील बघ ! आपलं घर देवाचं देऊळ बनायला हवं. देवळात सारं काही देवासाठीच करायचं असतं. शरीर देवाच्या सेवेसाठी आहे. डोळे त्याला पहाण्यासाठी आहेत. कान त्याचे नाम ऐकण्यासाठी आहेत. मुख त्याची गीत गाण्यासाठी त्याला आळविण्यासाठी आहे. हात त्याची कामं करण्यासाठी आहेत. त्याला न्हाऊ माखू घालण्यासाठी आहेत. त्याचा शृंगार करण्यासाठी आहेत. पाय त्याच्याकडे जाण्यासाठी आहेत. 'राधे ! हे सारं तूं सांगून तूं सुनामुलांकडून हे करवून घे. महाजनांची ही परंपरा अशीच चालवायला हवी. विठोबा आपण होऊन आपल्या घरी आलाय. त्याची मनोभावे सेवा करायला हवी. तो आपल्याला काही कमी पडू देणार नाही. '

मध्यरात्रीपर्यंत सासु सुनेला, रमा राधेला सारे काही सांगत होती. ती सावधपणाने सारे ऐकत होती. मध्यरात्री राधेला निजायला सांगून रमा ही अंथरूणावर पडली. शरीर चंद्रभागेच्या काठी पंढरीत विसावले होते. आकाशात तारका चमचमत होत्या. स्वच्छ चंद्रप्रकाशात सारे वातावरण नीरव शांत होते. अशाच रात्री वृंदावनात दूरून कोठून तरी बासरीचे मंद स्वर कानी यायचे. त्या स्वरांनी प्रतिक्षा करीत अंथरूणावर अष्टसखी विसावत असत.

अक्रूराने ज्या मार्गाने श्रीकृष्णास आपल्या रथात बसवून मथुरेस नेले. त्या मार्गावर रथचक्रांच्या धावांच्या मातीत उमटलेल्या खुणांवर विरह व्यथेने व्याकूळ झालेल्या व्रजगोपी किती तरी काळ आक्रंदत लोळत होत्या. वस्त्र प्रावरणांची त्यांना शुद्ध नव्हती. आपाद मस्तक त्या धुळीने माखल्या होत्या. उद्धव त्यांचे सांत्वन करायला व्रजात आला होता. उद्धव ज्ञानी होता तर व्रज गोपी भावधुंद भक्त होत्या. त्या उद्धवास म्हणाल्या, 'अरे ! तू भगवंताचे

ध्यान करा असे आम्हाला सांगतोस खरे. ध्यानाने भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव होईल असे तूं सांगतोस. पण ध्यान मनाने करायचे असते ना ? आमचे मन येथून जाताना तो आपल्या बरोबर घेऊन गेला आहे. ध्यान करायला आमचे मनच आमच्यापाशी राहिले नाही. ज्यांचे मनच कृष्णस्वरूप बनले आहे. त्यांच्या शरीराने होत असलेले सारे व्यवहार बाह्यतः अत्यंतिक विरह व्याकूळतेचे दर्शन घडवित असले तरी अंतरंगातील श्रीकृष्ण स्वरूपाची परम सख्यत्वाची साक्ष देत असते. गो लोकवासी पूज्य प्रभुदत्त ब्रह्मचारी यांना उत्तर रात्री मधुर मुरलीचे स्वर ऐकू येत असत. त्यावेळी ते आकस्मित भाव धुंद होत असे. मी त्यांच्या निकटवर्तीयांकडून ऐकले आहे.

रमेलाही रात्री अंथरूणावर विसावल्यावर दुरुन ऐकू येणाऱ्या बासरीचे मंद स्वर मनाने आपल्या प्राणसख्याकडे व्रजात घेऊन जात. ती मुळातच व्रजवासिनी होती. तिचा प्रेमस्वरूप प्राणसखा व्रजात होता. भूवैकुंठ पंढरपूरातील त्याच्या अस्तित्वाची जाणीव भक्तजनांना देण्यासाठी ती दुरुन पंढरीस आली होती. ते सुपूर्त लौकिक कार्य झाले होते. आता तिला व्रजात परत जाण्याची घाई झाली होती.

राधा भल्या पहाटेच उठून आपल्या नित्याच्या उद्योगाला लागल्याचे रमेच्या लक्षात आले. तिने खाली आल्यावर विचारले, 'राधे ! खूप लवकर उठलीस गं ?' 'झोप झाली अन् मी उठले' राधा उत्तरली. 'आज नाथषष्ठी आहे. इथली पूजा हे करणार आहेत. मी सारी तयारी करते. तुम्ही मामंजी बरोबर देवळात जाऊन या. मी नंतर जाईन.' राधा सुस्वर आवाजात गोपी गीत गात दधीमंथनाला लागली.

नामदेव आण्णांचे प्रातःस्मरण म्हणणे सुरू झाले होते. त्यांच्याबरोबर रमा चंद्रभागेच्या स्नानाला गेली. चंद्रभागेच्या जागी तिला यमुनेचे विशाल पात्र दिसू लागले. माघारी परत येताना

आण्णांचे स्तोत्र पठण सुरू असे. घरी आल्यावर वस्त्रांतर करून हाती पूजा साहित्य घेऊन ते देवळात जायला निघाले. रमा त्यांच्या मागोमाग लोण्याची वाटी घेऊन निघाली. राधेने, पुढच्या पिढीने दधिमंथन करून काढलेले लोणी त्या वाटीत होते.

श्री पांडुरंगाच्या गर्भागाराचे द्वार उघडताच नामदेव आण्णांनी 'हरि ॐ उतिष्ठ ब्रह्मणस्पते देव यन्तस्त्वेमहे !' ह्या सुक्ताने उठण्याचे आवाहन केले. सुक्ताच्या अखेरचे 'हरये नमः हरये नमः हरये नमः ।' म्हणत असतानाच काकड आरतीस प्रारंभ झाला. काकड्याच्या ज्योती प्रकाशात जागृत झालेल्या देवाचे मुख प्रसन्न भावाने उजळून निघत असते. श्रींचे समचरण हळूवारपणाने धुतले गेले. मुखप्रक्षालनासाठी ओठांना शुद्ध जल लावले गेले. नेत्रांनाही जल लावले. कपाळाला गंध लावून लाडू दूधाचा नैवेद्य दाखविला गेला. पंचामृत स्नान सुरु झाले. शुद्धोदक स्नानानंतर गो दुग्धाचे स्नान होत असतानाच श्री विठ्ठलाच्या मुखापाशी लोण्याचा गोळा नेला गेला. रमेने आपल्या उजव्या हातातील लोणी पुढे केले ती भावमग्न होऊन म्हणाली, 'घे नं ! आज राधेने लोणी काढलंय पण मीच घेऊन आलेय ! घे रे ! आणखीन घे ! रमेच्या हातातले लोणी पांडुरंगाच्या ओठांना लागल्याचे आण्णांच्या लक्षात आले. लोणी केवळ ओठांनाच लागलेले नव्हते. तर त्याचे दोन्ही गाल त्या लोण्याने माखलेले होते. हे चालू असतानाच देवाला गंधफूल वाहून आरती सुरू झाली होती. भावमग्न रमा एकटक दृष्टीने विठ्ठलाकडे पहात आहे. हे सभोवतालच्या सर्वांच्याच ध्यानात आले. रमेच्या मुखमंडलावर विलक्षण दैवी तेज चमकत आहे. हे दर्शनार्थींना जाणवत होते.

देवाच्या सकाळच्या पूजेचे उपचार संपल्यावर नामदेव आण्णांच्या पाठोपाठ रमेने श्रीचरणांवर आपले मस्तक ठेवले. काहीवेळ ती श्रीचरणांवर मस्तक ठेवूनच होती. आण्णांनी तिला हलकेच बाजूला घेतले. तिच्या डोळ्यातून अश्रुधारा वहात होत्या. त्या पुसत असताना रमेने श्रीविठ्ठलाच्या मुखमंडलाकडे पाहिले.

त्यांच्याही डोळ्यात अश्रु चमकत असल्याचे रमेला जाणवले. माघारी जाताना पुनः पुनः ती देवाकडे पहात होती. रूक्मिणीचे दर्शन घेऊन रमा आपल्या घरी परतली.

तळघरातील देवाचे सकाळचे सारे उपचार दादाने उत्तम रितीने पार पाडले होते. राधा प्रसन्नपणे त्याला सहाय्य करीत होती. भगवत् चरणी नतमस्तक होऊन रमा म्हणाली, 'दादा खूप छान पूजा केलीस. पांडुरंग प्रसन्न आहे बघ! राधे तुझं लोणी देवाला आवडलं हो!' दादा राधेने मातृपितृ चरणांना तेथेच वंदन केले. 'चिरंजीव व्हा पुत्रवती हो' दोघांनी एकाच वेळी आशीर्वाद दिले.

गृहस्थाश्रमाचे सकाळचे सारे व्यवहार राधेच्या मदतीने रमा पार पाडीत होती. पाकसिद्धी झाल्यावर नैवेद्याचे ताट घेऊन दादा तळघरात देवापाशी गेले. अतिथीची प्रतिक्षा करीत नामदेव आण्णा दरवाजापाशी उभे होते. 'राधे ! आज नाथ षष्ठी आहे. तो अतिथी रूपाने नक्कीच येईल. त्याला ताकपीठच द्यायला हवे.' रमेने राधेला सांगितले. दगडीत ताकपीठ कालवून राधा ओसरीवर घेऊन आली. रमा ओसरीवर बसली होती. तिच्यापुढे ताकपीठाची दगडी ठेवून राधा दुपारच्या भोजनाची पाने मांडावयास घरात गेली. दादा नैवेद्य दाखविण्यासाठी तळघरात देवापाशी होते आणि नामदेव आण्णा अतिथीची प्रतिक्षा करीत. दादा बाहेर जाऊन कोणाशी तरी बोलत होते.

त्या सर्वांना चकवून तो बालस्वरूप आत आला. भावमग्न रमेला हलवून तो म्हणाला, 'राधे ! मला खूप खूप भूक लागलीय गं ! खायला दे नं !' रमेने किंचित सावध होऊन त्याच्या दृष्टीला दृष्टी लावली तोच तो आहे. हे तिने जाणले. त्याने आपल्या स्वयंतेजस्वी नेत्रांनी रमेचे तेज आपल्याकडे आकर्षून घेतले. रमा श्रीकृष्ण स्वरूपात विलीन झाली. शरीर भूमीवर विश्राम पाऊन शांत झाले. लगबगीने राधा बाहेर आली. 'सासूबाई ! सासूबाई !' तिने मोठ्याने हाक मारून हंबरडा फोडला. दादा आण्णा धावत आले. रमेचे पार्थिव शरीर शांत झाले होते. बाजूची ताकपीठाने भरलेली दगडी चाटून

पुसून स्वच्छ झाली होती. अपूर्व तेजोरमेचे मुखमंडल झळकून गेले होते. 'आई!' म्हणून दादाने आकृंदत तिच्या वक्षावर आपले मस्तक टेकविले. नामदेव आण्णा शांतपणाने दादाला सावरीत म्हणाले, 'दादा! तुझी आई ह्या लोकीची नव्हती रे! ते मी केव्हाच समजलो होतो! ती कृष्णसखी होती. ती वृंदावन वासाला गेली आहे.'

## महाजन बडवे स्वतःच्या खर्चातून सेवा करतात ती खालीलप्रमाणे

१) पहाटे ५ वा. काकडा आरती
२) सायंकाळी ७ वा. धूपारती
३) रात्री ९ वा. शेजारती नंतर दरवाजा बंद करतात.
४) चातुर्मासात श्रीमत् भागवत कथा याच घराण्याची असते.
५) भाद्रपद शु. ९ ते पौर्णिमेपर्यंत श्रीमत् भागवत सप्ताह
६) आश्विन वद्यात हरिनाम सप्ताह व श्री ज्ञानेश्वरी पारायण
७) श्रीकृष्ण जन्माष्टमी, दत्त जयंती
८) वारीच्या वेळा सोडून इतर वेळी मुख्य दरवाजा दु. १२ ते ४ बंद असतो.
९) या देवास कोणत्याही प्रकारचे उत्पन्न नाही.
१०) या देवाचा फोटो काढण्यास सक्त मनाई आहे.
११) दर्शनास आल्यावर मोबाईल बंद करावा.

विनीत : **महाजन बडवे परिवार**
महाजन वाडा, श्रीक्षेत्र पंढरपूर

।। श्री ताकपीठे विठोबा प्रसन्न ।।



संत सौ. रमाबाई महाजन बडवे यांच्या १० व्या वंशातील विद्यमान श्री. बंडा महाराज महाजन यांचे चातुर्मासात श्रीमत् भागवत कथेवर रोज दु. ४ ते ५ निरुपण असते.

भाद्रपद महिन्यात श्रीमत् भागवत सप्ताह. आत्तापर्यंत शुकेतील नैमिष्यारण्य, काशी, महाराष्ट्र व विदर्भात लवूळ, सायगाव, जळगाव, सोलापूर, मिरज, सांगली, वाटेगाव, इस्लामपूर, अंबक, औरंगाबाद, नांदेड, नेवासा, मुंगीपैठण, पाटकूल, गोवर्धन रिसोड कौंडण्यपूर, नागपूर, श्रीक्षेत्र माहूर इत्यादी ठिकाणी आपल्या भावविश्व वाणीतून श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले.

कौंडण्यपूर येथे 'वाणी भूषण' पुरस्कार देण्यात आला.


संपर्कासाठी

**ह. भ. प. श्री. बंडा महाजन बडवे**

(चरित्र लेखकाचे भाऊ)

श्रीमत् भागवत कथाकार

महाजनवाडा, श्रीक्षेत्र पंढरपूर, जि. सोलापूर.

मो. नं. ९७६७२१०३११



## वाचस्पती श्री विष्णुजी क्षीरसागर

'त्यांनी आपल्या प्रभावशाली वाणीने विचार व चैतन्य सतेज ठेवण्याचे कार्य अविरतपणे दीर्घकाल केले आहे. या देशाच्या सांस्कृतिक मूल्यांची जाणीव जागृत ठेवण्याचे त्यांचे कार्य सध्याच्या वैचारिक वातावरणात आणि वैचारिक अराजकाच्या काळात अत्यंत मोलाचे आहे. समाजातील जाणत्या व्यक्तींनी तरी ह्या कार्याचे महत्व ओळखून ते कार्य सातत्याने करणाऱ्या वाचस्पती श्री. विष्णुजी सारख्या व्यक्तीचे ऋण मानले पाहिजे.'

**धुंडामहाराज देगलूरकर**

वाचस्पती श्री. विष्णुजी क्षीरसागर यांच्या षष्ठ्यब्दिपूर्ति समारंभाच्या निमित्ताने पाठविलेल्या संदेशातून